# नवभारत

वर्ष ७ वें ] ऑगस्ट १९५४ [ अंक ११ वा



किंमत १ रुपया









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें
अंक अकरावा

# नवभारत

ऑगस्ट
१९५४

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. वेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई (जि. सातारा)

# 'नवभारत' मासिक, ऑगस्ट १९५४

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या त्या वेळीं दिला आहे– का. सं. ]

**श्री. भा. पं. बहिरट** एम्. ए. ( पंढरपूर ) — संतवाङ्मयाचे व्यासंगी. 'प्रेमबोध' या मासिकाचे एक संपादक.

**श्री. ना. ल. वैद्य** एम्. ए. बी. टी. — हल्लीं लंडन येथें एम्. ए. चा अभ्यास करीत आहेत. पूर्वी ते ॲडिस अबाबाला होते. त्यांचे लेख व लघुकथा मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**प्रा. मधुसूदन फडके** –– कागल ( जि. कोल्हापूर ) येथील 'गो. कृ. गोखले कॉलेज'मध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

**डॉ. ल. ह. टेंगशे** एम्.ए. पीएच्.डी. –– नडियाद ( गुजरात ) येथील कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. 'टागोर आणि त्यांची कला' या विषयावर लिहिलेल्या त्यांच्या प्रबंधावरून त्यांना पीएच्. डी. मिळाली. हा प्रबंध डॉ. राधाकृष्णन् यांच्या प्रस्तावनेसह प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**प्रा. नारायण र. देशपांडे** – एम्.ए. एलूएल्.बी. पीएच्.डी. –– पुणें विद्यापीठांत राज्यशास्त्रविभागाचे प्राध्यापक व प्रमुख.

**श्री. बाबा मोहोड** –– माधान ( जि. अमरावती ) येथें कस्तूरबा स्मारक निधीच्या बुनियादी शाळेंत शिक्षक. 'भूदानयज्ञाचीं गाणीं' या पुस्तकाचे लेखक.

**डॉ. र. भ. कर्णिक** — ( पुणें ) पुणें येथून निघणाऱ्या 'महाराष्ट्र मेडिकल जर्नल' या इंग्रजी मासिकाचे संपादक.

" **चुकीची दुरुस्ती**–– या अंकांत पान ४८ वर सीनेटर एडवर्ड जॉनसन यांचें अवतरण तळटीपेंत दिलें आहे. तें तळटीपेंत चुकीनें छापलें गेलें आहे. तें अवतरण लेखाच्या आरंभीं अग्रभागीं अभिप्रेत असून, तें तसें वाचावें. "

श्री. भा. पं. बहिरट

# 'अमृतानुभवा'चें तत्त्वज्ञान

अनुभवाचें मंथन करून त्यांतून काढलेल्या मौलिक सिद्धांतास तत्त्वज्ञान म्हणतात. भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत अशा मंथनास आरंभ वैदिककालांतच झालेला आहे. वेद, ब्राह्मणें, उपनिषदें यांतून तत्त्व-जिज्ञासा व भिन्न भिन्न विचारवंतांनीं तिला दिलेलीं उत्तरें आढळतात. दर्शनकालांतहि कपिल-गौतमांसारखे स्वतंत्र प्रज्ञेचे तत्त्वज्ञ होऊन गेले. बादरायणांनीं वेदान्त-सूत्रांत उपनिषदांचें सार आणलें. या साराचें स्पष्टीकरण करण्याच्या निमित्तानें शंकर-रामानुजाचार्यांनीं आपापलीं तत्त्वज्ञानें पुढें मांडलीं. प्रमुख आचार्यांनंतर मात्र स्वतंत्र विचार लुप्त होऊन टीकावाङ्मयच निर्माण झालें व भारतीय तत्त्वज्ञानाची वाढ खुंटल्यासारखी झाली. संस्कृत वाङ्मयाची ही अवस्था असतांनाच १३ व्या शतकांत मराठी वाङ्मयाच्या क्षितिजावर ज्ञानेशासारखा तेजस्वी तारा उगवला. स्वतःच्या प्रज्ञेच्या व प्रतिभेच्या बलावर ज्ञानेश्वरांनीं स्वतंत्रपणें अनुभवाचें मंथन केलें व त्यांतून 'अमृतानुभव'रूपी अमृत बाहेर काढलें.

ज्ञानेशांची ज्ञानेश्वरी मराठी वाङ्मयाच्या वाचकांना सुपरिचित आहे. पण 'अमृतानुभवा'चा परिचय असणारे वाचक थोडेच आढळतात. वास्तविक रीत्या ज्ञानेशांचें एकंदर वाङ्मय समजण्यास 'अमृतानुभवा'ची अत्यंत आवश्यकता आहे. ग्रंथकर्त्याचा निश्चित तात्त्विक दृष्टिकोन कळल्यावांचून त्याच्या ग्रंथांचें रहस्य अवगत होणें कठीण असतें. ज्ञानेश्वरी ही कालदृष्ट्या अगोदर निर्माण झाली असली तरी विचारदृष्ट्या 'अमृतानुभव'च अगोदरचा आहे. 'अमृतानुभवां'तील तत्त्वच ज्ञानेश्वरींत कृष्णार्जुनांच्या कहाणीच्या रूपानें मांडलें आहे. ज्ञानेशांचा 'हरिपाठ', 'पासष्टी', 'अभंग' हे समजण्यास सुद्धां 'अमृतानुभव' समजून घेण्याचीच आवश्यकता आहे. 'पासष्टीं'त ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी एका संवित्तीचीच स्फूर्ति आहे असें प्रतिपादन केलें आहे पण त्याची तात्त्विक उपपत्ति 'अमृतानुभवां'तच लाविली आहे. 'हरिपाठा'ची सुरुवात "देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी" अशी आहे तर तें देवद्वार कोणतें याचें उत्तर 'अमृतानुभवां'तच मिळतें. 'अमृतानुभवा'चा शेवट "अकृत्रिम भक्तीचें वर्म" सांगण्यांतच झाला आहे व त्या दृष्टीनें जेथें 'अमृतानुभव' संपतो तेथें 'हरिपाठ' सुरू होतो असें म्हणतां येईल. भारतीय तत्त्व-ज्ञानाच्या इतिहासांतील एक स्वतंत्र व महत्त्वाचें तात्त्विक विवेचन करणारा, तसेंच ज्ञानेशांच्या इतर ग्रंथांना गुरुकिल्लीप्रमाणें सहायभूत होणारा उत्कृष्ट ग्रंथ या दृष्टीनें 'अमृतानुभवा'ची थोरवी अनन्यसाधारण आहे.

## प्रमाणचिकित्सा

पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या अर्वाचीन कालच्या तत्त्वज्ञां-मध्यें कँटनें प्रमाणशास्त्राचें महत्त्व उघडकीस आणलें. तत्त्वज्ञानाच्या प्रांतांत हटवादीपणा व संशयवाद हे दोन्ही सोडून योग्य ती चिकित्सा अवलंबिली पाहिजे व त्याकरतां तत्त्वविचार करतांना अगोदर सत्यज्ञानाचें साधन व ज्ञानाची मर्यादा यांचा विचार केला पाहिजे असें कँटनें प्रतिपादन केलें. कँटपूर्वी सुमारें २००० वर्षें गौतमांनीं भारतामध्यें हीच विचारसरणी अंगीकारून प्रमाणशास्त्राचा पाया घातला. तेव्हांपासून भिन्नभिन्न भारतीय दर्शनकार आपले विचार मांडण्यापूर्वी आपणांस मान्य असलेल्या प्रमाणांची प्रतिष्ठा सांगूं लागले. प्रत्यक्ष, अनुमान, शब्द, उपमान, अर्थापत्ति व अनुप-लब्धि हीं सहा प्रमाणें होत. त्यांपैकीं चार्वाक हे फक्त प्रत्यक्ष प्रमाण मानतात. जैन हे प्रत्यक्ष व अनुमान मानतात. नैयायिक हे पहिलीं चार मानतात तर प्रभाकरपंथी मीमांसक पांच मानतात. कुमारिलपंथी मीमांसक सर्व सहांना मान देतात. शंकराचार्यादि वेदान्तदर्शनकार हे सर्व प्रमाणांत शब्दप्रमाणास अधिक महत्त्व देतात. उपनिषदें, गीता व ब्रह्मसूत्रें या प्रस्थान-त्रयींतील वचनांवरच त्यांनीं आपापल्या दृष्टिकोनांची इमारत उभी केली आहे. ज्ञानेश्वरांनीं गीतेवर स्वतंत्र व्याख्यान केलें आहे. परंतु त्यांची भूमिकाच वेगळी आहे. ती 'अमृतानुभवां'तील पुढील ओवीवरून स्पष्ट होते.

'परी शिवें का श्रीवल्लभें । बोलिलें येणेंचि लोभें ।
मानूं तें हे लाभे । न बोलतांही ॥' – अमृ. ३-१८

('शंकरांनीं किंवा विष्णूंनीं सांगितलें म्हणूनच हें मानलें पाहिजे असें नाहीं. तर त्यांनीं न सांगतांहि हें कळणारें आहे.') या प्रमाणें ज्ञानेशांचें 'अमृतानुभवां'-तील तत्त्वज्ञान हें वचनप्रामाण्यावर उभें नसून स्वानु-








भवावर व स्वतःच्या विचारावर अधिष्ठित आहे.

आत्म्याचें स्वरूप सांगणें हा 'अमृतानुभवा'चा विषय आहे. या कामीं शब्दप्रामाण्य कसें सदोष आहे हें ज्ञानेशांनीं 'शब्दखंडन' या प्रकरणांत विशद केलें आहे. शब्द हा विधिनिषेधाचे मार्ग दाखविण्यास उपयोगी आहे. परंतु अविद्येचा नाश करून आत्म्याचें स्वरूप दाखविण्यास त्याचा कांहींच उपयोग नाहीं. कारण अविद्या म्हणजे जी विद्यमान नाहीं ती. नाश करण्यापुरतीहि जी नाहीं तिला शब्द काय करणार ? ('म्हणोनी नाशापुरती। अविद्या नाही निरुती। मा तर्काचें खुरपें। खांडणे कोणा'॥ ६-२३-२. 'नाहीं तयाचेनि नासे। शब्द नये प्रमाणदशे'॥ ५६॥) आत्मा हा स्वतःसिद्ध असल्यामुळें तेथेंहि शब्द उपयोगी पडत नाहीं. ('तैसा आत्मा सच्चिदानंदु। आपणया आपण सिद्धु। आतां काय हे शब्दु। तयाचे तया'॥ ९३॥) प्रत्यक्षादि इतर प्रमाणांचीहि हीच अवस्था आहे. स्वतःसिद्ध ज्ञानस्वरूप आत्मा हें सर्व प्रमाणांचें गृहीतकृत्यच असल्यामुळें आत्म्यानेंच सर्व प्रमाणें प्रकाशित होतात. प्रमाणांनीं आत्मा प्रकाशित होत नाहीं.

"कोणाहि प्रमाणाचेनि हातें।
वस्तू घेना नेघे आपणयातें॥" ९४॥
"आत्मा सिद्धूचि मा कोणे। काय साधावें॥ ९७॥"
"विषो नाहीं कोणाहि। जया प्रमेयत्वचि नाहीं।
तया स्वप्रकाशा काई। प्रमाण होये॥
प्रमेयपरिच्छेदें। प्रमाणत्व नांदे।
ती काई स्वतःसिद्धे। वस्तूच्या ठाईं॥" ५-१६, १७.

प्रमाणप्रमेयव्यवहारास आधारभूतच आत्मा आहे. तेव्हां आत्म्याचें अस्तित्व सिद्ध करण्यास प्रमाणांची गरज नाहीं. ज्ञाता व ज्ञेय हीं एका ज्ञानस्वरूप आत्म्याचींच स्फुरणें होत असा ज्ञानेशांचा सिद्धान्त आहे. हाच त्यांचा चिद्विलासवाद होय.

### विरोधी मतांचें खंडन

स्वतःचा सिद्धान्त प्रस्थापित करण्यास्तव ज्ञानेशांनीं आपल्या मताच्या विरोधी पक्षांचें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष खंडन केलें आहे. चार्वाकांचा जडवाद, सांख्यांचा पुरुष-प्रकृतिवाद, माध्यमिकांचा शून्यवाद, योगाचारांचा विज्ञानवाद, अद्वैतवाद्यांचा अज्ञानवाद या सर्वांचें खण्डन त्यांना करावें लागलें. तें क्रमानें असें :

जडच अंतिम सत्य असून चैतन्य हा आगंतुक धर्म आहे असें जडवादी चार्वाक मानतात. परंतु आत्म्याच्या अस्तित्वाइतकी खात्री दुसऱ्या कशाचीच नाहीं. एक आधुनिक पाश्चात्त्य ग्रंथकार म्हणतो : "The primary certainty is experience, and this is not a physical object but something mental. When I think I perceive a physical object, it is conceivable that I might be dreaming, but I could not even dream that I existed, without existing. And here by 'I' is meant my mind, not my body" – (Dr. Ewing: 'The Fundamental Questions of Philosophy', pp. 99). मूळ सत्ता चैतन्याचीच असून तेंच दृश्य रूपानें नटतें त्यामुळें जडाला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. "लेणें आणि भांगारें। भांगारचि एक स्फुरे" ॥ ७. २३६॥...... 'आता दृश्यपणें दिसो। का द्रष्टा होउनी असो। परी हा वांचूनि अति सो। नाहीं एथ॥' २४०.

सांख्यमतामध्यें प्रकृति व पुरुष हीं भिन्न तत्त्वें मानिलीं आहेत. त्यांपैकीं पुरुष हा चेतन व प्रकृति ही जड आहे. ज्ञानेशांना हें मान्य नसून 'अमृतानुभवा'च्या पहिल्या अध्यायांतच त्यांनीं प्रकृतिपुरुषाच्या ऐवजीं 'देवोदेवी'ची कल्पना मांडली आहे. देवोदेवी भिन्न नसून "स्त्रीपुरुष नामभेदें। शिवपण एकलें नांदे" अशी स्थिति आहे.

अंतिम सत्ता 'शून्य' आहे असें शून्यवादी समजतो पण 'शून्य आहे' असे म्हणणाराच शून्यवादाचें खंडन करतो. कारण, कांहीं नाहीं म्हटलें तरी म्हणणारा शिल्लक उरतोच. त्याचें अस्तित्व नाहींसें होत नाहीं. "तरी कांहीं नाहीं सर्वथा। ऐशी जरी व्यवस्था। तरी नाहीं हे प्रथा। कवणासी गा॥ ७.२६॥ शून्य सिद्धांत बोधू। कोणी सत्ता होय सिद्ध।... २७॥ माल्हविता दिवें। माल्हविता जरी मालवे। तरी दीपु नाहीं हें फावे। कवणासी गा" ॥ २९॥. दिवा मालविला तरी तो मालविणारा इसम मालविला जात नाहीं त्याप्रमाणें शून्य म्हटलें तरी म्हणणारा शून्य होत नाहीं.

विज्ञानवादी हे विज्ञानाच्या प्रवाहासच आत्मा

मानतात. त्यांच्या मतें बाह्यपदार्थहि नाहींत व वृत्ति-प्रवाहास निराळा आधारहि नाहीं. पाश्चात्त्य तत्त्ववेत्त्यांत ह्यूमच्या मताशीं हें मत जुळणारें आहे. ज्ञानेशांच्या मतें विज्ञानमालिका स्वतंत्र नसून तिला आश्रय चैतन्य आहे. " दृश्याचिया सृष्टी । दिठीवरी दिठी । उठलिया तळवटी । चिन्मात्रचि " ॥ ७.१२४ ॥

**अज्ञानखंडन**

भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत अज्ञानवाद हा एक महत्त्वाचा वाद आहे. शांकरतत्त्वज्ञानाची सर्व इमारत अज्ञानवादावरच उभी आहे. रामानुज, मध्व, वल्लभ, निंबार्क यांनीं आपापल्या विशिष्टाद्वैत, द्वैत, शुद्धाद्वैत, द्वैताद्वैत इत्यादि भूमिकांवरून अज्ञानवादावर टीका केली आहे. ज्ञानेश्वरांनीं अद्वैताच्या भूमिकेवरून-च अज्ञानवादाची चिकित्सा करून त्याची निरर्थकता दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. याकरितां त्यांनीं संपूर्ण ग्रंथाच्या १/३ हून जास्त ओव्यांचें सातवें प्रकरण खर्चीं घातलें आहे. शांकरमताप्रमाणें ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय ही त्रिपुटी अज्ञानकार्य होय. ( ' अविद्या-कल्पितं वे द्य वे दि तृ वे द ना दि भे द म् ' – ब्र. सू. भा. १. ४ ) ज्ञानेशांच्या मताप्रमाणें त्रिपुटी म्हणजे संवित्स्वरूप आत्म्याचेंच स्फुरण होय. " तेवि शिवोनि पृथ्वीवरी । भासती पदार्थांचिया परी । प्रकाशें ते एक-सरी । संवित्ति हे ॥ १२ ॥ म्हणोनि अविद्यानिमित्तें । दृश्य-द्रष्टृत्व वर्ते । ते मी नेणें आईते । ऐसेचि असे ॥ ८ ॥ " – ( चां. पा. ). दृश्यद्रष्टृत्व हें अविद्या-निमित्तानें भासत नसून संवित्तीचेंच स्फुरद्रूप होय हा सिद्धान्त ज्ञानेशांनीं ' चांगदेवपासष्टीं 'त मांडला आहे. व त्याचींच साधकबाधक प्रमाणें ' अमृतानुभवां 'त विस्तारलीं आहेत. तर्काची भूमिका धरूनच त्यांनीं आपलें म्हणणें पटविण्याचा उपाय केला आहे.

" द्वैतदशेचें आंगण । अद्वैत बोळगे आपण । भेदू तंवतंव दूण । अभेदासी " ( ९-२९ ) ही ' अमृता-नुभवां 'तील ओवी अत्यंत महत्त्वाची व सारभूत आहे. जितका भेद वाढेल तितका अभेदच दुणावतो, शंकरा-चार्य म्हणतात त्याप्रमाणें अभेदाचें आवरण अगर विक्षेप होत नाहीं. अद्वैतच द्वैताच्या क्रीडांगणांत उतरतें, मायेमुळें तसें भासतें असें नव्हें. या भूमिके-वरूनच ज्ञानेशांनीं अज्ञानाच्या अथवा मायेच्या कल्पनेचा धांडोळा घेतला आहे. या धांडोळ्यांतील मुख्य मुद्दे खालीलप्रमाणें आहेत :

( १ ) ज्या अज्ञानाचा आत्मज्ञानानें बाध होतो तें आत्म्याबरोबर नांदतें असें म्हणणें विरुद्ध होय.

( २ ) अज्ञान हें आत्म्याबरोबर नांदूं शकत नाहीं. त्याअर्थीं तें जगाचें उपादानकारण ( उ० घटाचें कारण माती ) होत नाहीं.

( ३ ) अज्ञान हें उपादानभूत आहे असें गृहीत धरल्यास तें कार्यापूर्वीं बीजरूपानें असलें पाहिजे. आच्छादन करणें हा अज्ञानाचा धर्म आहे तेव्हां त्या वेळीं तें आत्म्यास आच्छादणार व आत्मा आच्छादि-ल्यावर अज्ञान आहे असें तरी कोण सांगणार ? तेव्हां वरील प्रमाणें गृहीत धरून सुद्धां उपादानभूत अज्ञाना-ची सिद्धि होऊं शकत नाहीं.

( ४ ) अज्ञान हें स्वतः जड असल्यामुळें अज्ञाना-ची सिद्धि अज्ञानानें होत नाहीं.

( ५ ) अज्ञान हें आत्म्याबरोबर आहे म्हटलें तरी सिद्ध होत नाहीं व वेगळें म्हटलें तरी सिद्ध होत नाहीं. " आत्मेनशी विरोधी । म्हणोनि नुरेचि संबंधी । वेगळे तरी सिद्धि । जायेचिना ॥ " हें सांगतांना ज्ञानेशांनीं मिठाच्या मासोळीचा मोठा मार्मिक दृष्टांत वापरला आहे. मिठाची मासोळी केली व ती जिवंत झाली अशी कल्पना करा. असली मासोळी पाण्यांत-हि जगणार नाहीं. कारण मिठाची असल्यामुळें ती विरघळून जाईल. बरें, पाण्याच्या बाहेर ठेवल्यासहि ती मरून जाईल. कारण पाण्याखेरीज मासा जगूं शकत नाहीं. " लवणाची मासोळी । जन्ही होय जिव्हाळी । तरी जळीं ना वेगळी । न जिये जेवी ॥ " ७.३६ ( ' जीव जीती जीवनासंगें । मत्स्या मरण त्या त्यागें ' ॥ – तुकाराम )

( ६ ) दृश्य हें प्रत्यक्ष दिसतें व या प्रत्यक्ष प्रमाणानेंच अज्ञान सिद्ध होतें असा पूर्वपक्ष केल्यास त्याचें उत्तर असें कीं अज्ञानवाद्याच्या मतानेंच दृश्य हें अज्ञान नसून अज्ञानकार्य आहे. बीजभूत अज्ञानाचें प्रत्यक्षज्ञान होत नाहीं. त्यामुळें प्रत्यक्ष प्रमाणानें अज्ञानाचें अस्तित्व सिद्ध करतां येत नाहीं.

( ७ ) अनुमान प्रमाणानें तरी अज्ञानाची सिद्धि करतां येते काय ? – दृश्याचा पसारा समोर पसरला आहे व यावरूनच त्याचें कारण अज्ञान हें अनुमानानें सिद्ध होतें असें पूर्वपक्षी म्हणतो. जमीनीवर वृक्ष

टवटवीत दिसतात. तें दुसऱ्या कोठून पाणी आणतां-नाहि दिसत नाहींत. तेव्हां ते मुळानेंच पाणी शोषून घेत असले पाहिजेत. त्याप्रमाणें दृश्यावरून अज्ञान आहे हें समजतें असें अज्ञानवाद्याचें म्हणणें. ( ' भूमीवेगळीं झाडें । पाणी घेती कवणीकडे । न दिसती आणि अपाडे । साजी असती ॥ तरी भरवसेनी मूळें । पाणी घेती हें न ढळे । तैसें अज्ञान कळे । दृश्यास्तव ॥ ' ७. ९१, ९२. ) याला ज्ञानेशांचें उत्तर असें आहे कीं, प्रकाशित करणाऱ्या वस्तूस अज्ञान म्हणणें हें चुकीचें आहे. " अगा ऐसिया ज्ञानातें । अज्ञान म्हणणें केउतें । काय दिवो करी तयातें । अंधारु म्हणिपे ॥ अगा चंद्रापासून उजळ । जेणें दाविली वस्तु धवळ । तयातें काजळ म्हणिजतसे " ॥ ९५, ९६. तेव्हां हा सर्व ज्ञानपूर्ण व्यवहार पुढें असतांना तेथें अज्ञानाचा पसारा कसा म्हणतां येईल ? ( ' तैसा जाणणेयाचा वेव्हारु । जेथें माखला समोरु । तेथें आणिजे पुरु । अज्ञानाचा ' ॥ १०० ॥ ).

( ८ ) याप्रमाणें अज्ञानाची सिद्धि होत नसल्यामुळें आरोप अगर अध्यासहि नाहीं. चिद्रूप आत्मा आपल्या सहजस्वभावानें स्फुरत असून स्वतःच स्वतःस पहात आहे. एथें आरोपाचें काय कारण ? " या लागीं एके चिद्रूपें । आपणया आपणपें । देखिजे का आरोपें । काय काज ॥ १६५ ॥ ". रत्नास प्रभा, सोन्यास सोनेरी रंग, चंदनास सुगंध हे कोठून आणलेले आरोपित नसून मूळचेच सहज असतात त्याप्रमाणें चिद्रूपाची जगत्स्फूर्ति सहजच आहे. " किळेचें पांघरूण । आपजवी रत्ना कोण । की सोनेलें सोनेपण । जोड जोडू ॥ चंदन सौरभ वेंटी । ... तैसा चैतन्यें गिवसिला । चिद्रूप स्फुरे " ॥ १६६ – ७० ॥

ज्ञानेशांनीं घेतलेला अज्ञानाचा धांडोळा काळजीपूर्वक लक्षांत घेतला म्हणजे ज्ञानेश्वरींत " भाष्यकारातें वाट पुसत" असें विनयानें म्हणणाऱ्या ज्ञानेशांचा 'अमृतानुभवां'तील स्वतंत्र दृष्टिकोन ध्यानांत येतो. तो ध्यानांत न घेतल्यामुळें डॉ. पेंडसे यांनीं शांकरमत व ज्ञानेशांचें मत एकच आहे अशी कल्पना करून ' अमृतानुभव ' ग्रंथास तर शंकराचार्यांच्या अध्यासभाष्यावरील विस्तृत प्रवचनाची उपमा दिली आहे ! ( ' ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान ' पृ. ३१२ ) वास्तविक शांकरमतामधील अज्ञानाच्या कल्पनेनें अद्वैत-तत्त्वज्ञानांत जो दोष निर्माण झाला तो ज्ञानेशांनीं नाहींसा करून अद्वैत-तत्त्वज्ञानास योग्य ती दिशा दाखवून दिली व त्यांतून श्रेष्ठ अशी नैतिक व धार्मिक मूल्यें उदयास आणलीं असें म्हटलें पाहिजे.

## चिद्विलासाचा सिद्धान्त

अज्ञानखंडन म्हणजे ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानाचें प्रवेशद्वारच होय. मायावाद टाकून ज्ञानेशांनीं आपला चिद्विलासाचा सिद्धान्त मांडला आहे. ज्ञानघन परमात्मा स्वतःच्या आवडीनें अनेकधा नटला आहे. तो कसा नटला हें कोडें मानवी बुद्धीस पडतें, नटणारास नाहीं. तो सतत प्रकाशाचीं द्वारें उघडीतच आहे. चैतन्यांतूनच दृश्याच्या राशीवर राशी उठतच आहेत व पुन्हां मूळ चैतन्य तळवटीं शिल्लकच आहे. एखादा रसिक मनुष्य आपलें रूप वारंवार आरशांत न्याहाळतो. आत्मा त्याहून अनंत पटींनीं रसिकराज आहे. तो क्षणक्षणाला स्वतःचें रूप पहातो एवढेंच नव्हे तर ज्या आयन्यांत तें पहावयाचें तो आयनाहि क्षणक्षणांस नवीन तयार करतो.

" येवढेही सांकडें । जेणें सारूनी येकीकडे ।
उघडलीं कवाडें । प्रकाशाची ॥ १२३ ॥
दृश्याचिया सृष्टी । दिठीवरी दिठी ।
उठलिया तळवटीं । चिन्मात्रचि ॥ १२४ ॥
दर्शनरिद्धि बहुवसा । चित्‌शेपु मातला ऐसा ।
जो शिळा न पाहे अरिसा । वेच रत्नाचा ॥ १२५ "

आत्मा हा नानारूपानें विकसित झाला तरी त्याची एकरूपता भंगत नाहीं. संकोच पावला तरी याचा हाच आहे. आत्मविलासास दुसऱ्या कशाची उपमा देतां येत नाहीं. हा स्वप्रकाशाचे घास करून भराभर गिळीत आहे. तरी तो प्रकाश संपत नाहीं व याच्या पोटांत कोठें सुरकुती दिसत नाहीं इतकें याचें पोट भरलेलें आहे.

" भलतैसा फाके । तरी एकपणा न मुके ।
नाना संकोच तरी असिके । हाचि आथी ॥ २५७ ॥
म्हणोनि इये आत्मलीळे । नाहीं आन कांटाळे ।
आता येयाचिये तुळे । हाचि यया ॥ २६५ ॥
स्वप्रकाशाच्या घासीं । जेवितां बहु वेगेंशी ।
वेचेना परी कुशी । वाखही ना पडे ॥ २६६ ॥
ऐसा निरुपमापरी । आपुलिये विलासवरी ।
आत्मा राणीव करी । आपुले ठायीं ॥ २७७ ॥ "








जग ही आत्म्याची म्हणजे वस्तूचीच प्रभा आहे. वस्तूच्याच प्रभेनें वस्तूस शोभा येते व ती वस्तूसच मिळते. असें असतां या वस्तूला जगद्रूपानें प्रगट होण्याला अज्ञान हा हेतु मानणें व्यर्थ होय.

" म्हणोनि जग असकी । वस्तुप्रभा ॥ २८९ ॥
यालागी वस्तुप्रभा । वस्तूचि पावे शोभा ।
जातसे लाभा । वस्तुसिचि ॥ २९१ ॥
वांचुन वस्तु इया । आपणपें प्रकाशावया ।
अज्ञान हेतु वाया । अवघेचि ॥ २९२ ॥ "

## ज्ञानेश्वर व शंकराचार्य

याप्रमाणें अज्ञानाची कल्पना निरर्थक ठरविल्यामुळें ज्ञानेशांची ईश्वर, जीव व जगत् यांच्या स्वरूपाविषयीं कल्पनाहि शांकरमताहून भिन्न झाली आहे. शांकरमताप्रमाणें फक्त निर्गुण ब्रह्मच सत्य असून बाकी सर्व म्हणजे ईश्वर अथवा सगुण ब्रह्म, जीव व जगत् हे आभास होत. व्यावहारिक सत्ता जरी त्यांनीं मानली असली तरी ते शेवटी आभासच होत. ज्ञानेशांच्या मतानें, ब्रह्म व ईश्वर भिन्न नसून एकच होत. माया ही उपाधि नसून परब्रह्माची अंतर्गत शक्तीच होय. ' अमृतानुभवां'त ज्ञानेशांनीं ब्रह्ममायेच्या ऐवजीं ' देवोदेवी'ची कल्पना मांडली आहे व ही दोघेहि ' निरुपाधिक ' आहेत असें म्हटलें आहे. " ऐशीं ही निरुपाधिकें । जगाची जियें जनकें । ती वंदिलीं मिया मूळिकें । देवोदेवी ॥ "१.१ ॥ अज्ञानाची अथवा मायेची कल्पना सोडल्यास स्वरूपाच्या अंतर्गत शक्तीचीच कल्पना मानावी लागते. त्याप्रमाणें ज्ञानेशांनीं मानली आहे. मायेच्या ऐवजीं शक्ति घेतल्यास जगताचें व जीवाचेंहि स्वरूप बदलतें. जीव व जगत् हीं त्या शक्तीचींच कार्यें होय. केवळ आभास नव्हेत. जगांतील प्रत्येक परमाणूंत शिवशक्ति अगर ' देवोदेवी ' अनुस्यूत आहे. जगाचें उपादानकारण अज्ञान नसून शिव-शक्ति यांचा गोड असा मेळ म्हणजे त्यांच्यामधील प्रेमच होय. " कैसा मेळु आला गोडिये । दोघे न माती जगीं इये । कीं परमाणूमाजी उवाये । मांडिली आहाती ॥ जिहीं एक एकावीण । न कीजे तृणाचेंही निर्माण । जिये दोघे जीवप्राण । जिया दोघा ॥ १२ ॥ " ( उवाये = आनंदानें. ) शंकराचार्यांची माया ही ब्रह्माची उपाधि आहे तर ज्ञानेशांची देवी अगर शक्ति ही देवाची अगर शिवाची अंतर्गत शक्ति आहे. म्हणून ब्रह्म आणि माया ही जोडी एकमेकांचा जीव घेणारी आहे तर देवोदेवी ही जोडी एकमेकांचे जीव की प्राण आहेत !

ज्ञानेश व शंकराचार्य यांच्यांत फरक आहे हे डॉ. पेंडसे यांना देखील कबूल करावें लागलें आहे. ते म्हणतात : " संन्यासावर आचार्यांचा भर अधिक आहे . . . ज्ञानेशांचा भर भक्तीवर अधिक आहे . . . ज्ञान आणि उपासना, अद्वैतवाद आणि एकदेवतावाद, यांत शंकरांनीं जसा भेद केला आहे, तसा ज्ञानेशांनीं केलेला दिसत नाहीं " ( कित्ता, पृ. ४४७–४८ ). या भेदाचें कारण मात्र डॉ. मजकूर म्हणतात त्याप्रमाणें एकानें अन्वयावर तर दुसऱ्यानें व्यतिरेकावर भर दिला हें नसून दोघांच्या तत्त्वज्ञानाच्या मूळ बैठकींतच भिन्नता आहे हें होय.

' ज्ञानेश्वरीं'त ज्ञानेशांनीं कित्येक ठिकाणीं अज्ञान अगर माया हिचें वर्णन केल्यामुळें ते मायावाद स्वीकारतात असा गैरसमज होतो. या बाबतींत दोन गोष्टी लक्षांत घेतल्यास ' अमृतानुभव ' व ' ज्ञानेश्वरी ' एकाच तात्त्विक पायावर रचलेल्या आहेत असें दिसून येईल. पहिली गोष्ट अशी कीं अज्ञानाची कल्पना जेथें मांडून विचार केला आहे त्यांपैकीं एका मुख्य ठिकाणीं ही कल्पना परंपरागत अद्वैतवेदान्तांतील आहे असा स्पष्ट खुलासा केला आहे. ज्ञानेश्वरीच्या पंधराव्या अध्यायांत जगत् हें अज्ञानकार्य आहे असें धरून वर्णन केलें आहे. त्या वर्णनांतच " वेदान्तीं हाचि प्रसिद्ध । बीजभाव ॥ ८८ ॥ " " ऐसी यया वेदान्तीं । निरूपणभाषा प्रतीति ॥ ९० ॥ " म्हणजे अज्ञानास बीजभाव मानून वेदान्ताची निरूपण करण्याची पद्धत आहे. इतकेंच नव्हे तर हा वेदान्ताचा आव अगर पोकळ डौल आहे असेंहि म्हटलें आहे. " जयासी का बीजभाव । वेदान्तीं केला ऐसा आव ॥ १५.५१३ ॥. " दुसरी लक्षांत घेण्याची गोष्ट म्हणजे मायावादाच्या वर्णनाच्या जोडीस चिद्विलासाचीं वर्णनें ( उ० ' जालेनि जगें मी झांके । तरी जगत्वें कोण फांके । कीळेवरी माणिके । लोपिजे काई ॥ १४.१२४ ॥ ) आलेलीं आहेत. त्यावरून मायावादाचा अपुरेपणाच दाखविला गेला आहे.

## ज्ञानेशांच्या अध्यात्मवादाचें वैशिष्ट्य

भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत अध्यात्मवाद ( Idealism ) हा प्रमुख आहे. त्याचीं निरनिराळीं







रूपें निरनिराळ्या तत्त्वज्ञांनीं मांडली. चैतन्य हें अंतिम सत्य खरें पण त्याच्या निरनिराळ्या अंगांवर भर दिल्यानें अध्यात्मवादाच्या कक्षेंतील भिन्न मतें निर्माण झालीं. शंकराचार्य, गोरक्षनाथ व ज्ञानेश्वर हे तिघेहि अध्यात्मवादीच. पण शंकराचार्यांनीं चैतन्याच्या ज्ञान-स्वरूपावर भर दिला व जगत् हें ज्ञानाचा आभास असें मानून ते संन्यासमार्गाकडे वळले. गोरक्षनाथांनीं चैतन्याच्या शक्तिस्वरूपावर भर दिला व त्यामुळें शक्ति-उपासनेला महत्त्व देऊन ते योगमार्गाकडे गेले. ज्ञानेश्वर-महाराजांनीं हीं दोन्हीं अंगें मान्य करून चैतन्याच्या ठायीं असणाऱ्या स्वप्रीतिस्वरूप ' भक्ति ' या मूलभूत अंगाकडे दृष्टि केंद्रित केली व ते भक्तिमार्गाकडे वळले. ( " ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति । शैव म्हणती शक्ति । आम्ही आपुली भक्ति । परम म्हणों ॥ " ज्ञा. १८-११३३ ). या दृष्टीनें ज्ञानेशांचें तत्त्वज्ञान म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाचें परिपक्व फलच होय.

'अमृतानुभवा'चा शेवट 'अकृत्रिम भक्ती'मध्यें झाला आहे. ( " कोण्ही एक अकृत्रिम । भक्तीचें हें वर्म । योगज्ञानविश्राम । भूमिका हे ॥ " अमृ० १०-६० ). भक्ति म्हणजे वैयक्तिक भावना नव्हे. मूळस्वरूपाच्या ठिकाणींच ती उल्हसत आहे. 'अमृतानुभवा'च्या पहिल्या प्रकरणांत देवोदेवीच्या प्रेमाचा उल्हास वर्णिला आहे. तें नुसतें काव्यमय वर्णन नसून वस्तुस्थितीच आहे. स्वरूपाच्या ठिकाणच्या या प्रेमोल्हासाची अनुभूति मानवी जीवनांत घेणें हाच पंचम पुरुषार्थ होय. या अनुभूतीचा मार्ग म्हणजे स्मरणच होय. मूलभूत प्रेमाची स्मृति जीवनांत जागविणें व संपूर्ण जीवन प्रेममय बनविणें हेंच जीविताचें साफल्य होय. या प्रेमानुभूतीपुढें योग हा 'दिहाचा चांदु' होय. या प्रेमानुभूतींतूनच जगाकडे सहानुभूतीनें व जिव्हाळ्यानें पहाण्याची दृष्टि उमलते, जगापासून विन्मुख न होतां प्रतिकूल परिस्थितीशीं टक्कर देण्याची शक्ति निर्माण होते व स्वतःचीं कर्तव्यें कठोरतेनें पार पाडण्याची धमक उत्पन्न होते. अशा रीतीनें 'अमृतानुभवां'तील तत्त्वज्ञानांत ज्ञान, भक्ति व कर्म यांचा सुंदर संगम झालेला असून त्याच्या पायावरच महाराष्ट्रांतील भागवतधर्माची इमारत उभी आहे. " संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥ ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया ॥ " ही तुकोबांची उक्ति यथार्थच आहे.

---

## मी तुला पाहिलें — !

मी तुला पाहिलें —
भल्या पहांटे नभांत
जेव्हां रम्य उषेचें स्वप्न रंगलें,
डुलत उमलल्या फुलाफुलांतुन
सहज मनोहर हास्य विलसलें

मी तुला पाहिलें —
तरूतरूंच्या पर्णांतुन हळु
मंजुळ जेव्हां कुणि कुजबुजलें,
वातावरणीं तरल वायुच्या
ओंठावरतीं गान तरळलें

मी तुला पाहिलें —
माघामधलें शुभ्र चांदणें
दिशांत जेव्हां धुंद हांसलें,
गहन तमांतुन नक्षत्रांचें
मंद मधुरसें स्मित निरखिलें

मी तुला पाहिलें —
वनीं-उपवनीं वसंतवैभव
कणाकणांतुन जेव्हां खुललें
श्रावणांत अन् क्षितिजीं सुंदर
इंद्रधनूचें रंग उमटले

मी तुला पाहिलें —
आषाढांतिल आकाशांतुन
जेव्हां अवचित वज्र चमकले
अन् वर्षेच्या नयनांमधुनी
अमृत करुणेचें पाझरलें

मी तुला पाहिलें —
इथें-तिथें चहुंकडे तुझें मज
अमूर्तांत अस्तित्व भासलें
खुळाच मी परि, राउळांत या
आजवरी तुज व्यर्थ शोधिलें !

— शंकर रामाणी








# इंग्लंडमधील 'वि-शाला'

गेल्या वर्षी मी लंडनमधील 'कॉम्प्रिहेन्सिव्ह्' (–ज्याचें भाषांतर 'वि-शाला' असें मी करूं इच्छितों–) शाळा पहावयास गेलों होतों. शाळेच्या मुख्याध्यापकांचें हपीस म्हणजे एक छोटीशी खोली. (याच खोलींत आम्ही दुपारचें जेवण घेतलें.) मुख्याध्यापक साठी उलटून गेलेले. (या देशांत ६५ व्या वर्षी निवृत्त व्हायचें असल्यानें 'साठी बुद्धि नाठी' असें म्हणतां येणार नाहीं !) त्यांनीं आम्हांला सगळी शाळा दाखविली, वर्गांतून हिंडविलें आणि सर्व प्रकारची माहिती अगत्यानें पुरविली. दुपारीं साडेतीननंतर, ते आम्हांला शाळेपासून पाऊण मैल अंतरावर थेम्सच्या कांठीं असलेल्या मोकळ्या पटांगणाच्या बाजूला घेऊन गेले आणि म्हणाले : "या विस्तीर्ण जागेंत आमची 'वि-शाला' कांहीं वर्षांनीं सुरू व्हायची आहे. लवकरच बांधकाम सुरूं होईल; आणि मग, 'कॉम्प्रिहेन्सिव्ह स्कूल' मूर्त स्वरूपांत खऱ्या अर्थानें येऊं शकेल. सध्यां तरी, 'कॉम्प्रिहेन्सिव्ह स्कूल' आमच्या देशांत नांवापुरतेंच आहे. लंडनमध्यें हें आमचेंच, फक्त एकच–"

मुख्याध्यापकांचा निरोप घेतल्यानंतर, आमचा एक मित्र विनोदानें म्हणाला, "हें स्कूल कॉम्प्रिहेन्सिव्ह् होतें कीं 'ॲप्रिहेन्सिव्ह्' ?"–– आमच्या मित्राच्या फटकळ विनोदांतील अतिशयोक्ति सोडून दिली, तरी कॉम्प्रिहेन्सिव्ह् शाळा पाहून मन कांहीं प्रसन्न झालें नाहीं येवढं मात्र खरं. शाळेंत आठशें विद्यार्थी होते; आणि बहुतेक विद्यार्थी, गरीब कामगार वस्तींतले किंवा गरीब मध्यमवर्गांतले होते. त्यांच्या बुद्धिमत्तेचें प्रमाण ( I. Q. ) शंभराच्या आसपास (बहुतेकांचें खालींच) असावें असें, कांहीं विद्यार्थ्यांचीं पत्रकें पाहून आम्ही समजलों. शाळेंत भाषाविषयास (इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, लॅटिन, ग्रीक यांस) प्राधान्य नव्हतें, तर एकाद्या 'उद्योग'-('मॉडर्न् स्कूल') शाळेंतल्याप्रमाणें टाकटोकीस प्राधान्य जास्त आढळलें. या शाळेंतल्यापेक्षां 'प्रयोग'-('टेक्निकल् स्कूल') शाळा कांहीं दिवसांपूर्वी आम्ही पाहिली होती, तींत अधिक चांगल्या प्रकारची यंत्रसामग्री, अवजारें, व उपकरणें–हत्यारें, अद्ययावत् पद्धतीचीं आम्हांस दिसलीं होतीं. तेव्हां हीं शाळा म्हणजे एक कनिष्ठ दर्जाची 'प्रयोग'-शाला किंवा मोठ्या प्रमाणावरची 'उद्योग'शाला असें म्हणण्यास कांहीं हरकत नव्हती. या शाळेपासून किंचित् दूर एक 'ज्ञान' शाला ('ग्रामर स्कूल') होती. या 'ज्ञान'शालेंत मध्यमवर्ग, पांढरपेशा वर्ग आपलीं मुलें पाठवितात ( –या मुलांची बुद्धिमत्ता १०० च्या पुढें असते) आणि त्यामुळें 'वि-शाले'त निकृष्ट बुद्धीचीं मुलें येतात असें स्पष्टीकरण चर्चेच्या ओघांत हेडमास्तरनीं आम्हांस दिलें होतें. वास्तव, या 'वि-शाले'त, हुषार मुलांचे पालक आपल्या पाल्यांना पाठविण्यास बिचकतात. अत एव ही 'वि-शाला' न म्हणतां 'कुशाला' ('ॲप्रिहेन्सिव्ह'चें स्वैर भाषांतर !) म्हणावी, असा शेरा आमच्या मित्रानें मारला होता !

## १९४४ चा शैक्षणिक कायदा

आज इंग्लंडमध्यें जे थोडेसे ज्वलंत शैक्षणिक प्रश्न आहेत, त्यांत 'वि-शाला' असावी कीं नसावी, यावर मोठमोठ्या विचारवंतांचें लक्ष्य केंद्रित झालें आहे. १८७० सालीं फॉस्टॅर् शिक्षणविषयक पहिला कायदा पास झाला. आणि अगदीं अलिकडला म्हणजे बट्लर्चा १९४४ चा शैक्षणिक कायदा. या पाऊणशें वर्षांत इंग्लंडनें शिक्षणक्षेत्रांत आश्चर्यकारक प्रगति केली. पाऊणशें वर्षांपूर्वी, युरोपांतील कांहीं राष्ट्रांच्या मानानें इंग्लंड शिक्षणक्षेत्रांत थोडें मागासलेलेंच होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. पण पाऊणशें वर्षांत, इंग्लंड आज अग्रेसर राष्ट्रांच्या मालिकेंत मानाचें स्थान पटकावून आहे यांत शंकाच नाहीं. इंग्लंड हें राष्ट्र जुन्यांतील चांगल्या गोष्टींना जळवासारखें चिकटणारें असल्यामुळें, त्या चांगल्या गोष्टी जुनाट झाल्या तरी टाकून द्यायची त्याची प्रवृत्ति सहसा होत नाहीं; आणि म्हणूनच, गेल्या शंभर वर्षांत (१८५० च्या पॅरिस –








प्रदर्शनापासून ) जनतेनें शिक्षणक्षेत्रांत जबरदस्त धडका दिल्या, तरीहि आपल्या तटबंदीच्या आंत सुरक्षित राहण्याची वृत्ति कांहीं पक्षांत दिसून येते. १९०२ च्या बॅल्फोर्-मोरॅन्ट् ( – बॅल्फोर हें मुख्य प्रधान होते व मोरॅन्ट् हे शिक्षणखात्याचे सेक्रेटरी होते – ) शैक्षणिक कायद्यानें दुय्यम शिक्षणास विशेष महत्त्व दिलें, तर १९१८ च्या फिशर ॲक्टनें 'कन्टिन्युएशन स्कूल्स'-वर जोर दिला. यानंतरच्या काळांत हॅडो-कमिटीचा १९२६ चा व स्पेन्स-कमिटीचा १९३८ चा, हे दोन रिपोर्ट विशेष महत्त्वाचे म्हटले पाहिजेत. १९२४ सालीं मजूरपक्ष किंचित् काल अधिकारावर होता. पक्षांतील पुरोगामी विचारवंतांत, प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ डॉ. आर्. एच्. टॉनी (Tawney) हे होते. टॉनींनीं "सेकंडरी एज्युकेशन फॉर ऑल्" ही पुस्तिका लिहून, दुय्यम शिक्षण सर्वांना ( मुलांमुलींना ) देणें कां आवश्यक आहे नि तें कसें शक्य आहे, हें हिरीरीनें मांडलें. हॅडो-कमिटीवर या विचारप्रवाहांचा परिणाम झाला होताच; परंतु जुनें सर्वस्वी फेंकून देऊन नवीनाची ताबडतोब स्वीकार करण्याची बंडखोर वृत्ति इंग्लंडला मानवत नाहीं. "जुनें जाऊं द्या मरणालागुनि। जाळुनि अथवा पुरुनी टाका" असली घोषणा केशवसुतांच्या तुतारीप्रमाणें कोणी फेंकल्यास, फारसा परिणाम तेथें व्हायचा नाहीं. हॅडो-कमिटीनें, मुलांचें प्राथमिक शिक्षण ११ + या वर्षी संपवून, पुढील शिक्षण त्यांच्या कुवती-प्रमाणें त्यांना देण्यांत यावें असें सुचविलें; आणि प्राचीन काळापासून लब्धप्रतिष्ठित "ग्रामर" शाळेंत बुद्धिवान् मुलांनीं जावें आणि बाकीच्या मुलांनीं 'मॉडर्न्' ( उद्योग )-शाळेंत जावें असें सुचविलें. १९३८ च्या स्पेन्स-कमिटीनें याच सूचनांना पाठिंबा दिला व 'मॉडर्न्' मध्यें 'टेक्निकल्' स्कूल्सचेंहि शिक्का-मोर्तब केलें. १९४४ चा शैक्षणिक कायदा इंग्लंडच्या शिक्षणक्षेत्रांत अनेक कारणास्तव महत्त्वाचा आहे. ( – जातां जातां, इथें एका गोष्टीकडे वाचकांचें लक्ष वेधावेंसें वाटतें कीं युद्धकाळांत इंग्लंडनें महत्त्वाच्या शैक्षणिक कायद्यांना जन्म दिलेला आहे. – ) गेल्या ७५ वर्षांच्या इतिहासाचा विचार करून, निरनिराळे प्रयोग त्यानीं आणून, हा कायदा बनविला गेला आहे. इतकीं वर्षें 'ग्रामर स्कूल्स्' सर्वश्रेष्ठ समजलीं जात; त्या-नंतर 'टेक्निकल् स्कूल्स्' आणि खालच्या पायरीवर 'मॉडर्न् स्कूल्स्' – या कायद्यानें तिन्ही प्रकारच्या शाळांना एका पातळीवर आणलें, व कोणत्याहि मुलाला ( वा मुलीला ) अकरा वर्षें पूर्ण झाल्यानंतर, त्याच्या लायकीप्रमाणें व इच्छेप्रमाणें कोणत्याहि शाळेंत जायची मुभा ठेवली. पंधरा वर्षांपर्यंत शिक्षण सक्तीचें व मोफत केलें व पैशाचा प्रश्नच उद्भवणार नाहीं, अशी दक्षता घेतली. १९४४ च्या कायद्यानें जी शिक्षणव्यवस्था अंमलांत आणली ती आजतागायत चालू आहे.

## तीन वेगवेगळे शिक्षणप्रवाह

इंग्लंड-राष्ट्राची विशिष्ट प्रवृत्ति लक्षांत घेतां, इंग्लंड-चे कायदे हें 'कॉम्प्रोमाईज्'चे असतात हें समजतें. 'कॉम्प्रोमाईज्'चें भाषांतर, "तडजोड", "समेट" किंवा "समन्वय" असें करतां येईल; आणि, प्रत्येक कायद्याच्यावेळीं, वरीलपैकीं कोणतातरी एक, किंवा दोन किंवा तीनहि अर्थ खरे ठरतात. १९४४ चा कायदा 'समन्वया'चा असला, तरी 'समन्वय' कांहीं काळा-पुरताच टिकाव धरूं शकतो आणि 'समन्वया'तच कित्येक वेळां पुढील कलहाचीं बीजें पेरलेलीं असतात. १९४४ च्या कायद्याप्रमाणें ११ पर्यंत, प्राथमिक शिक्षण. त्या वर्षी "टेस्ट" होऊन, मुलाच्या लायकीप्रमाणें "ग्रामर" वा "टेक्निकल्" वा "मॉडर्न्" (–तीनहि शाळा 'सेकंडरी'च आहेत–) शाळेंत त्याला पाठवायचें. "टेस्ट"च्या निकालाप्रमाणेंच, मुलाचें तावत्कालपर्यंतचें शालेय रेकॉर्डहि विचारांत घेतलें जातें, त्याचप्रमाणें, विद्यार्थ्याची प्रवृत्तिहि विचारांत घेतली जाते. म्हणूनच, इंग्लंडमधलें शिक्षण "According to 3 A's, Age, Ability, Aptitude" असें म्हणतात. 'मॉडर्न्'च्या शब्दशः अर्थानें विचकण्याचा संभव ( परदेशस्थ वाचकाच्या बाबतींत ) आहे. 'मॉडर्न्' शाळेंत, धंदेवाईक शिक्षणावर भर दिला जातो, ( – पूर्वी धुळयास तशी सरकारी शाळा होती– ) आणि, प्रचलित शिक्षणाहून निराळें किंवा 'नवीन' म्हणून १९२६ सालीं 'मॉडर्न्' हें नांव दिलें गेलें. शिक्षणशास्त्रज्ञांची व अनेक विचारवंतांची या तीन वेगवेगळया शिक्षण प्रवाहांवर टीका होत आहे. कायद्यानें जरी तिन्ही शाळांची पातळी सम ठेवलेली असली तरी व्यवहारांत उच्च, मध्यम आणि कनिष्ठ अशीच पातळी आहे हें प्रत्येकजण मान्य करीलच. आजच्या लोकशाहीच्या काळांत अशी विभागणी करणें








घातुक आहे, सबब, तिन्ही प्रकारचें शिक्षण एकाच शाळेंतून दिलें जावें, ' त्रिवेणीसंगम ' घडवून आणावा, व हल्लींची जी ' ट्रिपार्टाईट ' पद्धत आहे, तीऐवजीं ' मॅल्टिलॅटरल् ' किंवा ' कॉम्प्रिहेन्सिव्ह् ' पद्धत अंमलांत आणावी, अशी सूचना केली जात आहे. ' मॅल्टिलॅटरल्'चा बोध ' संमिश्र शाला ' या शब्दानें होऊं शकेल; आणि ' कॉम्प्रीहेन्सिव्ह्'ला ' संयुक्त शाला ' अथवा ' वि-शाला, ' ' प्रशाला ' अशीं नांवें सुचतात. ' ग्रामर ' स्कूलची श्रेष्ठता अनेक वर्षांपासून आहे. त्यांना गेल्या आठशें वर्षांचा अखंड इतिहास आहे. त्या शालांना, ' वि-शाले'मुळें धोका पोंचेल, त्यांचें महत्त्व विलयाला जाईल आणि गेल्या शेंकडों वर्षांत त्यांनीं जी संस्कृति, कला निर्माण केली, साहित्य–तत्त्वज्ञान निर्माण केलें, तशी सेवा त्या शाला 'वि-शालें'त विलीन झाल्या तर करूं शकणार नाहीं, असा दावा 'ग्रामर'स्कूलच्या पुरस्कर्त्यांचा आहे. मँचेस्टरच्या ग्रामर-स्कूलमधील विद्वान् शिक्षक डॉ. एरिक् जेम्स् यांनीं ' क्रायसीस् इन् एज्युकेशन ' ही लहानशी पुस्तिका लिहून धोक्याचा इशारा दिलेला आहे, आणि तीनहि शालांचें एकत्रीकरण चुकीचें ठरेल असें स्पष्ट प्रतिपादिलें आहे. १९३८ सालीं स्पेन्स कमिटीच्या वेळींहि असले विचार उद्भवत होते. स्पेन्स कमिटीनें स्पष्ट शब्दांत आपलें मत ' संमिश्र शाला ' वा ' वि-शाला ' यां-विरुद्ध दिलें आहे.

## शिक्षणविचारांत वर्गीय प्रतिबिंब

' वि-शाला ' असाव्यात असा आग्रह लेबर पार्टी, ट्रेड युनियन काँग्रेस, कम्युनिस्ट पार्टी, कामगार-संघटना, 'द न्यू एज्युकेशन फेलोशिप्' इत्यादि डाव्या गटांतर्फे धरण्यांत येत आहे; आणि शिक्षणशास्त्रांतील सिद्धान्ताच्या दृष्टीनें, ' वि-शाला ' अस्तित्वांत येणें हेंच राष्ट्रास हित-कारक होय असें ते प्रतिपादतात. त्यांचें म्हणणें असें : अकराव्या वर्षीं जी विभागणी तीन शाळांतून केली जाते ती योग्य आहे काय ? अकराव्या वर्षी, मुलांच्या बुद्धीचा व आवडीचा प्रश्न सोडवितां येणें शक्य आहे काय ? ज्या ' टेस्ट्स ' घेतल्या जातात, त्या वाजवी आणि निश्चित असतात काय ? हल्लींचें प्रमाण पाहातां, स्थूल मानानें, शें. १५ टक्के ग्रामरस्कूल-मध्यें, १५ टक्के प्रयोगशालेंत आणि ७० टक्के उद्योग-शालेंत जातात. तिन्ही शाळा समपातळीवर असाव्यात, असल्या पाहिजेत, असें जें कायदा करणाऱ्यांचें मत, तें प्रत्यक्षांत कधीं तरी उतरलें आहे काय ? आणि ग्रामर स्कूलमध्यें जीं मुलें ११ व्या वर्षी जातात, ती त्यांची बुद्धि विशेष म्हणून व त्यांचा कल तिकडे म्हणून? कीं पालकांना परवडतें म्हणून ? मुलाच्या बुद्धीचा निर्देशांक, घेतल्या जाणाऱ्या टेस्टस् वरून, समजा ९५ असला तर त्या वर्षी त्याला, ' कमी बुद्धीचा, अतएव घिसाडकाम करण्यास योग्य ' म्हणून मॉडर्न् शाळेंत पाठविण्यांत येतें, तें शैक्षणिक दृष्ट्या अयोग्यच होय; कारण, बुद्धी-ची वाढ ११ व्या वर्षीच थांबत नसते. बुद्धीची वाढ तीसपस्तीस वर्षांपर्यंत सुद्धां सुरू असते असें मानसशास्त्रज्ञांनीं नुकतेंच सिद्ध केलें आहे. शें. ७० टक्के विद्यार्थी मॉडर्न् शाळांत पाठविण्यांत येतात, याचा अर्थ शें. ७० विद्यार्थ्यांची बुद्धि कमी दर्जाची आहे असाच नाहीं का होत ? आणि हा अर्थ अनर्थकारकच म्हटला पाहिजे. उद्योगशालांत जाणाऱ्या कित्येक विद्यार्थ्यांची बुद्धिमत्ता ग्रामरस्कूलमध्यें जाणाऱ्या मुला-च्या बुद्धीपेक्षां जास्त असणें अगदीं संभवनीय आहे. मी एका उद्योगशाळेंत गेलों असतांना, तिथले मुख्या-ध्यापक मला म्हणाले, " एकदां ११० अंकी ( IQ ) मुलगा आला होता आमच्या शाळेंत. कांहीं दिवसांनीं मी त्याला दुसऱ्या शाळेंत पाठविला. माझ्या शाळेंत तो ' अनफिट् ' होता. माझ्या शाळेंत मी ७० ते ९० अंकी मुलें घेतों. " याचा सरळ अर्थ असा कीं, उद्योग-शाला म्हणजे मंदशाला ! हें समीकरण घातुक आहे ! दुसरा सामाजिक घातुक परिणाम म्हणजे, उद्योगशालां-ना एकदां कमी लेखण्याची प्रवृत्ति रूढ झाल्यानंतर, त्या शाळेंत जाणाऱ्या मुलांकडे, त्या शाळेंत शिकवणा-ऱ्या मास्तरांकडे पाहण्याचा दृष्टिकोनहि तसाच होतो.

शिक्षणशास्त्रांतील एक तत्त्व समाजशास्त्राशीं अगदीं निकटचें संबद्ध आहे. तें असें कीं, ज्या तऱ्हेची समा-जाची रचना असते, त्याच तऱ्हेची शिक्षणव्यवस्था असते, आणि प्रस्थापित समाजरचनेस मान्यता देणारें सरकार अधिकारारूढ असेतों, शिक्षणव्यवस्था बदलत नाहीं. इंग्लंडमध्यें जी तीन प्रवाहांची शिक्षणव्यवस्था आहे, ती समाजांतील तीन वर्गांचें अस्तित्वच प्रतिबिं-बित करते. १९४४ सालीं संमिश्र मंत्रिमंडळ असतांना, समाजांतील तीन वर्गांतील भिंतींना फोडण्याचा प्रयत्न थोडाबहुत झाला, आणि वरिष्ठवर्गानें स्वतःभोंवतीं








जी तटबंदी उभारली होती, ती ढासळली हें खरें असलें, तरी वरिष्ठवर्ग आणि वरिष्ठवर्गाकडे नेहमीं डोळे लावून बसलेला मध्यमवर्ग यांचेंच प्राबल्य राज्य-कारभारांत व शासनसंस्थेंत असल्यामुळें, इंग्लंड हें राष्ट्र 'कल्याणकारी' (वेल्फेअर स्टेट) असण्याचा दावा राज्य करणाऱ्यांचा असला तरी त्याचा अर्थ राष्ट्रांत वर्ग-विहीन समाजरचना आहे असा मात्र नव्हे; आणि म्हणूनच 'ट्रिपार्टाईट' शिक्षण व्यवस्था बदलणें अवघड जात आहे.

शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें विचार केला तर ही शाला–विभागणी अयोग्य आहे असें वाटतें. पालक आपल्या मुलांना ग्रामरस्कूलमध्यें न पाठवितां उद्योगशाळेंत पाठवितात याचें कारण, त्या शाळेंतून बाहेर पडल्या-नंतर मुलाला तावडतोब उद्योगधंद्याला लावतां येतें. (वयाचीं पंधरा ते अठरा, हीं तीन वर्षें मुलाला आठवड्यांतून एकदां शाळेंत शिक्षण घ्यायला सक्तीनें यावेंच लागतें, आणि त्या दिवसाचा त्याचा पगार बुडत नाहीं.). ग्रामरस्कूलमध्यें मुलाला पाठविणें आर्थिक दृष्ट्या शक्य नसतें. लेडी सायमन (ऑफ् विदेनशॉ) यांनीं याची चर्चा करतांना एक मार्मिक वाक्य लिहिलें आहे. त्या म्हणतात — "If all private schools were abolished and every child in the land, of whatever social class, went through the same process of selection at eleven plus, and was allocated strictly on his ability and aptitude to the respective schools, social parity at least would be achieved. If, for instance, the duke's son went to the local secondary technical school and was then apprenticed to an engineering employer, and the duke's daughter with a low I. Q. and no particular aptitude that could be discerned at eleven plus, went to the modern secondary school, and if the dustman's son and daughter went to the local grammar school, a revolution would have taken place in England, equal to that of Russia, but there is no sign of such a revolution yet" ("Three Schools or One?" पृष्ठ ४४) याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं, इंग्लंडमधील शिक्षण-व्यवस्था 'according to Age, Ability, Aptitude' नसून, पालकाच्या आर्थिक कुवतीवर अवलंबून आहे, व हें कठोर सत्य खऱ्या लोकशाहीच्या तत्त्वाला हरताळ फांसणारें आहे. केवळ कायद्यानें तिन्ही शाळा समपातळीवर येऊं शकणार नाहींत; तर, तत्पूर्वी, समाजानें वर्गांवर्गांतील उच्चनीच भेद नष्ट केले पाहिजेत.

### शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनें 'वि-शाला'च इष्ट

'वि-शाले'विरुद्ध आक्षेप पुष्कळ आहेत. वि-शाले-साठीं इमारत फार मोठी लागेल, मुख्याध्यापकाचें काम फार वाढेल. ग्रामरशाला त्यांत समाविष्ट झाली तर, तिचें प्राबल्य इतर प्रकारांवर पडून 'वि-शाले'चें तत्त्वच उखडलें जाण्याचा संभव आहे; ग्रामरशाळेंत सहाव्या-वर्गा-(फॉर्म)चें महत्त्व सध्यां आहे, तें कमी होईल. निरनिराळ्या बुद्धिमत्तेचीं मुलें एकत्र मिसळल्यानें फायदा होण्याऐवजीं तोटाच होईल, इत्यादि. हे आक्षेप वस्तुतः फार गंभीर आहेत असें मुळींच नाहीं. आठशें मुलांची 'वि-शाला' ही संख्या सध्या आदर्श होऊं शकेल. (आपल्याकडे पुण्यामुंबईत मुलांची संख्या चार आंकड्यांपर्यंत असलेल्या शाळा आहेतच.) हेड-मास्तरचें कार्य व्यवस्थापक म्हणून मुख्यत्वें असणार; आणि ग्रामरस्कूलचें प्रभुत्व राहण्याचें कारण पडणार नाहीं; कारण, सध्यां स्कॉटलंडमध्यें "ऑम्निबस" शाळेचे जे प्रयोग सुरू आहेत ते, आणि अमेरिकेंतील 'मल्टिलॅटरल' शाळा, यांतील कांहीं योग्य गोष्टींचा 'वि-शाले'त अंतर्भाव करतां येईल. सहाव्या वर्गांतील ग्रामरस्कूलमधील मुलांची तयारी विश्वविद्यालयांत नेणाऱ्या परीक्षांना बसण्याची असते. त्या वर्गाला धोका पोंचेल हा आक्षेपहि उरणार नाहीं; कारण, आठशें मुलांतून, तीस मुलांचा तसा एक वर्ग सहजच तयार होऊं शकेल. दुसरी गोष्ट, विश्वविद्यालयांनीं सुद्धां आपले अभ्यासक्रम अधिक व्यापक करायला हवेत. अमेरिकेंतील अभ्यासक्रम या दृष्टीनें पाहतां फार व्यापक आहेत. कमजास्त बुद्धि-मत्तेचीं मुलें एकत्र मिसळल्यानें तोटा होईल हें म्हणणें








तर वस्तुस्थितीला सोडूनच आहे. मॉडर्न् स्कूलमध्यें कमी बुद्धीचींच मुलें असतात असें नव्हे तर गरीब आईबापांचींहि असतात. प्रश्न असा उद्भवतो, समाजांतील तिन्ही थरांतील मुलें एकत्र येण्यांत तोटा कीं फायदा ? – फायदाच होतो असें शिक्षण-तज्ज्ञांचें व समाजशास्त्रज्ञांचेंहि मत आहे. मंद – तीव्र बुद्धीच्या मुलांचा विचार करतां, जीं तीव्र बुद्धिमत्तेचीं मुलें असतात, त्यांना ग्रामरस्कूलमध्येंच पाठविण्याचा अट्टाहास कां म्हणून करावा तें कळत नाहीं. ग्रामरस्कूल-मधील अभ्यासक्रम म्हणजे, इंग्रजी, आर्ष भाषा, फ्रेंच वा जर्मन, इतिहासभूगोल, अर्थशास्त्र, गणित, बीज-गणित, भूमिति, फिजिक्स, केमिस्ट्री हे होत. प्रयोग-शाळेचा अभ्यासक्रम टेक्निकल्वर भर अधिक देतो, तर उद्योगशाळेंत, टाईपिंग, बुक्कीपिंग, पाकशास्त्र, शिवणकाम, वाढण्याचें शास्त्र, आणि इतर धंदेवाईक शिक्षण ( लोहारकाम, सुतारकाम, धोबीकाम वगैरे ). ज्याला आपण ' कलात्मक ' 'आस्वाद्यमानाय ' शिक्षण म्हणतों, त्याचा अभाव खालच्या दोन श्रेणींच्या अभ्यासक्रमांत आहे हें उघड होतेंच. ग्रामरस्कूलमध्यें अकरा(पूर्ण) वर्षी मुलांना धाडण्यांत येतें, तेव्हां त्या मुलाला इंजिनियर व्हायचें असलें किंवा उत्कृष्ट चित्रकार वा संगीतज्ञ व्हायचें असलें तर, शिक्षणव्यवस्था ते मार्ग बंद करते हें योग्य आहे काय ? – आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे, मंद बुद्धिमत्तेच्या मुलांत जे दुसरे कांहीं गुण प्रकर्षानें आढळतात, त्यांचा उपयोग हुशार विद्यार्थ्याला खास होऊं शकतो. हुशार विद्यार्थी उत्कृष्ट पुढारी वा संघटक असूं शकतो असें मुळींच नव्हे. उलट, कमी बुद्धिमत्तेच्या मुलांत क्रीडाप्रमुख, नाट्यप्रमुख इत्यादि गुण आढळून येतात. त्यांचा उप-योग 'वि-शाळें'त होऊं शकतो. वि-शाला ही कमी खर्ची-ची होऊं शकते, नव्हे होतेच; आणि तीनहि शाळा एकत्र असल्यावर, निरनिराळे प्रयोग शिक्षणशास्त्रांत करणें सोपें जातें. वि-शालेचा प्रयोग यशस्वी व्हायचा असला तर सरकार, शिक्षक आणि पालक या सर्वांचें सहकार्य अवश्यमेव हवें.

सध्यां 'विशाले' विरुद्ध जोराचे हल्ले 'पब्लिक स्कूल्स्'-( मानशाला )-कडून विशेष येत आहेत. ' मानशाले '-विरुद्धहि समाजांत विलक्षण टीका होत असल्यानें, त्यांचा विचार एका स्वतंत्र लेखांत करणें इष्ट होईल.

## हिरोशिमाचा संदेश

" मानवजातीच्या मनाला ज्याची कल्पनाहि शिवली नव्हती असा एक भयंकर कल्पान्त एका अमेरिकन बॉंबनें येथें करून दाखविला ! त्याचबरोबर त्यानें मानव-जातीची नश्वरता व क्षुद्रताहि उघडी करून दाखविली. हा प्रकार होऊन नऊदहा वर्षे लोटलीं नाहींत तोंच आपण जपानी लोकांनीं याच जागीं एका जीत्याजागत्या नव्या नगरीची स्थापना करून झालेल्या संहाराचा तिरस्कार केला आहे. कल्पान्तावरहि मात केली आहे ! यावरून हेंच सिद्ध होतें कीं मृत्यूपेक्षां जीवन, संहारा-पेक्षां सृजन श्रेष्ठ आहे ! हाच साक्षात्कार मला झालेला मी हिरोशिमाचा संदेश म्हणून भारतीयांना सांगेन.

जेव्हां आशियावर अंधार पसरला होता व युरोप-च्या पायतळीं आशिया दास बनून राहिला होता, अशा वेळीं जपाननें आपल्या अस्मितेचें तेज प्रकट करून साऱ्या आशियाला आशेचें किरण दाखविले, युरोप-जवळून सर्व विज्ञान व यंत्रविद्या शिकून उत्कर्षाचें शिखर गांठलें. परंतु ईश्वराची रचना अशी अतर्क्य कीं पाश्चात्त्य संस्कृतीच्या विकलतेचेंहि जपानला भीषण दर्शन झालें ! एकदां तो अनुभव पूर्णपणें घेतल्यानंतर, आपण जपानचे लोक आतां नवीन प्रस्थानाकरितां योग्य झालों आहों. आपला देश भाग्यदेवीचा लाडका आहे. ज्याप्रमाणें आपण पाश्चात्यांचें अनुकरण करून एक वेळ त्यांच्यावर मात करून दाखविली, त्याचप्रमाणें आपण आतां पौरस्त्यांची आत्मिक शक्ति प्रकट करून पश्चिमेला नवीन दिशा कां दाखवूं नये ? "

— **आचार्य काका कालेलकर** ( हिरोशिमा येथील नगरपित्यांच्या मानपत्राला उत्तर देतांना )

' मंगल प्रभात ' ( जुलै १९५४ वरून )








प्रा. मधुसूदन फडके

# बर्गसनचें तत्त्वज्ञान

## झेनोचें कोडें

'मारुति आणि मुंगी यांची धावण्याची शर्यत ठेवल्यास मारुतीची मजल मुंगीपुढें कधींच जाणें शक्य नाहीं' असें विधान करणाऱ्या मनुष्यास तुम्ही काय म्हणाल? तुम्ही कांहीं म्हणा, झेनो नांवाच्या एका प्रसिद्ध खिस्तपूर्व तत्ववेत्त्यानें अशा तऱ्हेचें एक विधान मोठ्या आव्हानपूर्वक केलेलें असून तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत तें 'झेनोचें कोडें' म्हणून प्रसिद्ध आहे. आपल्याकडील हनुमंताप्रमाणें प्राचीन ग्रीक लोकांत वेगपटुत्वाबद्दल 'ॲचिलीस' याची ख्याति असे. झेनोचा मात्र सिद्धान्त असा होता कीं, प्रथमारंभीं एकाद्या कांसवाला ॲचिलीसपुढें जर कांहीं अंतर जाऊं दिलें आणि नंतर एकाच वेळीं जर त्या दोघांची धावण्याची शर्यत सुरू केली तर ॲचिलीस कांसवाला कधींहि मागें टाकूं शकणार नाहीं! सुरवातीला ॲचिलीसपुढें कासवानें दहा हात मजल मारली आहे आणि ॲचिलीस कासवाहून दसपट वेगानें धावतो आहे अशी कल्पना करा. याचा साहजिक अर्थ असा कीं, ॲचिलीस प्रारंभींचें दहा हात अंतर तोडून जाईल तेव्हा कांसव त्याच्यापुढें एका हातावर पळतांना दिसेल; एका हाताचें हेंहि अंतर ॲचिलीस तोडून जाईल त्यावेळींहि कासव एकदशांश हात पुढेंच गेलेलें असेल; ॲचिलीस हेंहि अंतर धावून जाईल; तथापि एकशतांश हातानें कां होईना कांसव आपलें पुढेंच धावत असेल! यापुढेंहि एकसहस्रांश, एक दशसहस्रांश अशा पद्धतीनें दोघांतील अंतर कितीहि कमी कमी होत गेलें तरी तें संपूर्ण नाहींसें झालें असें दाखवितां येणार नाहीं. याचा सरळ निष्कर्ष असा कीं, 'ॲचिलीस कांसवाला कधींच गांठूं शकणार नाहीं!'

व्यवहारी बुद्धीच्या माणसाला असल्या 'अध्यात्म-कोड्यां'चें बहुधा कौतुक वाटणार नाहीं. तथापि असल्या कोड्यांचें उत्तर शोधल्याशिवाय तत्त्वमीमांसकाचें मात्र चालावयाचें नाहीं. करितां तत्त्वचिंतनाचें महत्त्व ज्यांना मान्य आहे त्यांनीं 'झेनोच्या कोड्यां'-चा अगत्यपूर्वक विचार केल्यास नवल नाहीं. अलीकडच्या काळांत कांटनें अशा प्रकारच्या अंतिम आध्यात्मिक कूटां-( Antinomies )चें एक स्वतंत्र प्रकरणच उपस्थित केलें आणि "समर्याद बुद्धिमत्ता अमर्याद विषयांचा विचार करूं जाते म्हणूनच अशा 'तात्त्विक अडचणी' उत्पन्न होतात" असा आपला निर्णयहि दिला. अगदीं अलीकडचा समकालीन फ्रेंच तत्त्वज्ञ हेन्री बर्गसन् याच्याहि तत्त्वज्ञानाचा उगम प्रस्तुत 'तात्त्विक अडचणीं'च्या चिंतनांतूनच झाला आणि त्यांचा परिहार करूं शकणारी जी 'भवमानते-'[१] ( Duration ) ची कल्पना त्याला त्यांतून सुचली, तीच त्यांच्या समग्र तत्त्वज्ञानाची सूत्रकल्पना होऊन राहिली.

## जीवनाची रूपरेखा

हेन्री बर्गसन्चा जन्म १८ ऑक्टोबर १८५९ रोजीं पॅरिस येथें झाला. त्याचे वडील संगीतज्ञ होते. त्याचा लहानपणाचा कांहीं काळ लंडन येथें गेला असला तरी त्याचें सर्व शालेय शिक्षण पॅरिस येथेंच झालें. शाळेंतील हुशार विद्यार्थ्यांत त्याची गणना होत असे. अभ्यासांतील बक्षिसें मिळविण्याची प्रायः

१ 'भवमानता' ( Duration ) म्हणजे चालूं राहण्याचा अथवा सतत होत राहण्याचा गुण. नुसत्या ( Becoming ) होण्यापेक्षां सतत होत राहण्याच्या कल्पनेंत अधिक विशिष्ट अर्थ आहे. भू ( भव ) = होणें या धातूपासून भव, भाव, भवन, भूति इ० नामें उपलब्ध होतात. पण त्यामधून इष्ट तो अर्थ प्रगट होत नाहीं. म्हणून त्याच धातूपासून वर्तमानकालवाचक विशेषण 'भवमान' व त्यापासून भाववाचक नाम 'भवमानता' असें मुद्दाम बनवून वापरलें आहे. 'भू' धातू आत्मनेपदी क्वचित् योजला जातो यास संस्कृत कोशकारांचा आधारहि आहे. तथापि चिकित्सक वाचकांस एकादा याहून सोपा शब्द आढळल्यास लेखकास आनंदच होईल :)

एकहि संधि त्यानें गमावली नाहीं. शाळेंत असतांनाच गणितामधील एका कूट प्रश्नाची त्यानें केलेली मीमांसा पारितोषिकास पात्र ठरली व एतत्संबंधींचा त्याचा लेख गणितविषयक एका मासिकांत प्रसिद्धहि करण्यांत आला. गणित आणि निसर्गशास्त्रें हे त्याचे व्यासंगाचे विषय असत. तथापि उच्चपदवीपरीक्षेसाठीं मात्र त्यानें भाषाविषयच पसंत केला. पदवी संपादन करून १८८१ मध्यें तो विश्व-विद्यालयाबाहेर पडला. ताबडतोब अँगर्स येथील विद्या-लयांत त्याला अध्यापकाची जागा देण्यांत आली. पुढें दोन वर्षांनीं एकाच वेळीं क्लेरमाँट फेरँड येथें प्राध्यापक व ब्लेस पास्कल शाळेंत अध्यापक अशी त्याची दुहेरी नेमणूक झाली. येथें त्यानें एकूण पांच वर्षे काम केलें. या अवधींत त्यानें नानाविध विषयांचा अभ्यास व चिंतन केलें. त्याच्या जिज्ञासेचा ओघ जसजसा पदार्थ-विज्ञानाकडून जीवशास्त्राकडे व नंतर मानसशास्त्रा-कडून तत्त्वज्ञानाकडे वळत गेला तशी त्याच्या 'प्रभावी' विचारसरणीची रूपरेखाहि याच काळांत त्याच्या मनांत तयार झाली. मध्यंतरीं ल्यूक्रेशससंबंधी त्यानें एक पाठ्यपुस्तक लिहून प्रसिद्ध केलें व आपला नियोजित प्रबंध पुरा करून १८८९ मध्यें डॉक्टरेटची पदवी संपादन केली. ताबडतोब प्रथम पॅरिस येथील रॉलिन कॉलेजांत व नंतर हेन्री क्वात्र विद्यालयांत त्याची प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. वक्तृत्वाची कला त्यास उत्तम प्रकारें अवगत होती. त्यामुळें त्याच्या व्याख्यानांचा लौकिक ह्यावेळेपासूनच बाहेर पसरूं लागला होता. आणि त्याच्या कांहीं स्फुट लेखनामुळें त्याच्या विद्वत्तेचीहि कीर्ति विद्यालयाबाहेर पोंचली होती. 'मॅटर ॲण्ड मेमरी' हा त्याचा तत्त्वज्ञानविषयक पहिला महत्त्वाचा ग्रंथ १८९६ मध्यें प्रसिद्ध झाला आणि पुढील वर्षी एकोल नॉर्मल येथें व त्यापुढें दोन वर्षांनीं कॉलेज डी फ्रान्स येथें प्रथम ग्रीक भाषेचा व नंतर अर्वाचीन तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक म्हणून तो रुजू झाला. १९०७ मध्यें 'क्रिएटिव्ह एव्होल्यूशन' हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर त्याला प्रथमतःच आंतर-राष्ट्रीय स्वरूपाची कीर्ति मिळाली, व ती दिवसानुदिवस वाढत गेली. तेव्हांपासून तो नियतकालिकांत लेख लिहूं लागला व सार्वजनिक व्याख्यानेंहि देऊं लागला. १९१२ च्या सुमारास त्यानें इंग्लंडांत व कोलंबिया विद्या-पीठांतहि व्याख्यानें दिलीं. येथून पुढें त्याचें तत्त्वज्ञान-क्षेत्रांतील महत्त्व शिरसामान्य होत गेलें. विसाव्या शतकांतील तत्त्वज्ञानावर त्याची कांहीं काळ मोठीच छाप उमटून राहिली. १९२७ सालीं त्याला साहित्य-विषयक नोबेल प्राइझ देण्यांत आलें. ४ जानेवारी १९४१ मध्यें तो मृत्यू पावला.

## तत्त्वज्ञानपद्धति बदलली पाहिजे

जीवनांतील नानाविध कर्मे फलद्रूप व्हावीं या आकांक्षेनें प्रेरित होऊनच आपली बुद्धि बाह्य वस्तु-जाताकडे प्रथमतः आकर्षित होते. बहुतेक काळ या ना त्या जीवनव्यापाराच्या जोखडालाच ती जुंपलेली असते, आणि बाह्य पदार्थमात्राविषयींचें आपलें ज्ञान—ज्यास आपण विज्ञान म्हणतों—तें देखील बव्हंशीं व्यवहार-सुलभतेच्या हेतूनेंच मर्यादित झालेलें असतें. हें मर्यादित ज्ञान हस्तगत करीत असतां कांहीं विशिष्ट कल्पनांचे 'सांचे' बुद्धीला वापरावे लागतात. त्यांचाच उपयोग करून वस्तुजाताचें खरेंखुरें ज्ञान म्हणजेच तत्त्वज्ञान तिला प्राप्त करून घेतां येईल असें नव्हे. तथापि घडतें मात्र असें कीं, बाह्य सृष्टीचा अभ्यास करीत असतां बुद्धीला जीं वळणें गिरवावीं लागतात त्याच वळणांनीं ती अंतःसृष्टीचें व अंतिम सत्याचेंहि वर्णन करण्याचा यत्न करिते. बुद्धीच्या ह्या 'अव्यापारेषु व्यापारा-' मधूनच अनेक प्रकारचे तात्त्विक अनवस्थाप्रसंग उत्पन्न होतात.

दिगंतरांत वसलेल्या, कमीअधिक व्याप्तीच्या व तारतम्यानें पाहतां स्थिर, नित्य, सहभावी (simul-taneous) परंतु विभिन्न आणि गणनीय वस्तु-मात्राचा परामर्श बुद्धीला व्यवहाराच्या सोयीसाठीं घ्यावा लागतो. साहजिक सर्व सृष्टि अशीच आहे किंवा हेंच सृष्टीचें अंतिम स्वरूप आहे असा तिचा ग्रह होतो; आणि नित्याच्या संवयीमुळें कालवस्तूवर दिक्कल्पनेचा, भवमानते-(Duration) वर व्यापकतेचा, कालानु-क्रमा-(Succession)वर सहभावितेचा आणि गुणावर संख्येचा आरोप ती करूं लागते. सदृशतेपुढें तिला नवीनता दिसत नाहीं; विभिन्नतेपुढें सातत्य सुचत नाहीं; निश्चितीपुढें स्वातंत्र्य ध्यानीं येत नाहीं; असण्याहून 'होणें' निराळें हें उमजत नाहीं आणि स्थित्यंतर व आंतरिक गतिमत्तेनें युक्त अशी कोणतीहि जिवंत प्रक्रिया ही जडमूढ व फार तर स्थानांतर पाव-

णाऱ्या एकाद्या कःपदार्थाहून वेगळी हें तिला समजत नाहीं. अर्थात् तिच्या ठेवणींतल्या ठराविक कल्पनांशीं वस्तुस्थितीचें बनत नाहीं. परिणामीं तत्त्वज्ञानक्षेत्रांत नानापरीचे वाद, पंथभेद आणि वैचारिक कूटें उत्पन्न होतात.

उदाहरणार्थ, आपल्या ठोकळेबाज विचारसरणीनुसार आपण असें समजून चालतों कीं, गतिमत्ता ही जणुं एकाद्या निर्जीव द्रव्याचे तुकडे एकापुढें एक ठेवून रचलेली रांग आहे; ती मोडूं शकते व तिच्या कोणत्याहि तुकड्याचे पुनः सूक्ष्मातिसूक्ष्म छेदहि करितां येतात; यामुळेंच ' ॲचिलीस आणि कांसव ' यांचें कोडें आपणास सहजासहजीं सुटत नाहीं. याच्या उलट, गतिमत्तेचें शुद्ध स्वरूप जर आपण समजून घेतलें आणि गतिमत्ता ही खरोखर अखंड असते, सातत्य हा तिचा प्रधान लक्षणधर्म आहे हें लक्षांत आणलें तर झेनोच्या तावडींतून आपण चुटकीसरसें सुटूं शकतों. कारण ' धावतां धावतां ' पावणेअकरा हाताच्या अंतरावर ॲचिलीस कांसवापुढें निघून जाईल हें एरवीं सहज सुचणारें उत्तर आतां तात्त्विक दृष्टीनेंहि समर्पक आहे याची आपण खात्री देऊं शकतों.

सारांश, भौतिक सृष्टीचें स्वरूप समजून घेण्यासाठीं शास्त्रज्ञांनीं जी ' भौमितिक ' पद्धति रूढ केली तिच्या आश्रयानें आध्यात्मिक सृष्टीचाहि विचार करण्याची चूक अनेक तत्त्ववेत्ते करीत आले आहेत. ही चूक आपण सुधारली पाहिजे. कारण मुख्यतः ज्या मृण्मय सृष्टीच्या अध्ययनाप्रीत्यर्थ या पद्धतीचा अवलंब करण्यांत येतो तीहून मनोमय सृष्टीचें स्वरूप भिन्न आहे. त्यामुळें शास्त्रज्ञांच्या निव्वळ गणिती दृष्टीच्या कक्षेंत मनोमय सृष्टीचें स्वरूप शिरूं शकत नाहीं; किंबहुना मृण्मय सृष्टीचेंहि अंतिमरूप खरें म्हणतां तिच्या होऱ्यांत येत नाहीं !

### शास्त्रज्ञान आणि कला

शास्त्रज्ञाची दृष्टि मर्यादित असते. आपल्या डोळयावर ढापणें चढवून सृष्टीचें समोर दिसणारें एकच अंग तो जणुं पहात असतो. सृष्टीचें खरें सर्वांगसंपूर्ण दर्शन घ्यावयाचें असेल तर हीं ढापणें आपण काढून टाकलीं पाहिजेत. कलावन्ताला कांहीं प्रमाणांत अशी विशाल दृष्टि प्राप्त झालेली असते. त्याला डोळयावरचीं ढापणें अजिबात काढून टाकतां येत नसलीं तरी तीं निदान थोडीशीं उचलून किलकिली करितां येतात. सर्वांना एवढेंहि साधेल असें नाहीं. परंतु सृष्टीलाच जणु मधून मधून विश्वदर्शन देण्याची लहर येते आणि निरनिराळया दिव्य दृष्टी असलेले कांहीं ' संजय ' ती उत्पन्न करिते. कुणाच्या डोळयावरील डाव्या ढापणाला लहानशी फट राहिलेली असते तर कुणाच्या उजव्या ढापणाला एक चिमुकला झरोका पडलेला असतो. त्यामधून सृष्टीच्या या ना त्या अभिनव आणि अभिजात अंगाचे कवडसे कलावन्ताच्या व त्याच्यामार्फत रसिकाच्या अंतरंगांत प्रवेश करूं शकतात. उदाहरणार्थ, बाह्य सृष्टीच्या एरवीं सहसा दृष्टीस न येणाऱ्या उत्तमांगाचा प्रत्यय चित्रकला आणून देत असते आणि अंतःसृष्टींतील एकाद्या अलक्षित प्रदेशाचा ठाव घेण्याचा यत्न कविता करीत असते. या अर्थानें निरनिराळया ललितकला हीं केवळ सौंदर्याचीं प्रदर्शनें नसून सृष्टीचीं (अपुरीं असलीं तरी) साक्षात् ' दर्शनें ' आहेत.

### बुद्धि आणि अंतर्ज्ञान

ही किमया तत्वेत्त्यालाहि करितां येणार नाहीं काय ? संपूर्ण जगताचें मूलस्वरूप जाणून घेण्याची तत्त्वज्ञाची आकांक्षा असते. या कामीं व्यवहाराच्या चाकोरींतून चालणाऱ्या बुद्धीचा उपयोग होणार नाहीं असें तर बहुतेक सर्वच तत्त्वज्ञानी म्हणत आले आहेत. साहजिकच ज्ञानाचें बुद्धीहून निराळें माध्यम उपलब्ध झाल्यास तत्ववेत्यास हवेंच आहे. या कामीं बर्गसनच्या मतें, तत्त्ववेत्याला कलावन्तापासून स्फूर्ति घेतां येईल. कारण कलाक्षेत्राप्रमाणें तत्त्वज्ञानाच्या प्रांतांतहि बुद्धीची जागा अंतर्ज्ञान ( Intuition ) घेऊं शकेल. अंतर्ज्ञान म्हणजे एकाद्या विषयाचें सहानभूतिपूर्वक मिळविलेलें ज्ञान. अर्थात् ह्या नव्या ज्ञानदृष्टीचा लाभ अगदीं सहजासहजीं होईल असें नाहीं. कारण अंतर्ज्ञान ही देखील एक ' कला ' च आहे. वास्तवतेच्या प्रदीर्घ व निकट परिचयामधून व सतत अभ्यासांतून ती साध्य होईल.

जीवसृष्टींतील उत्क्रान्तीचें अवलोकन केल्यास बुद्धि आणि उपजत प्रेरणा ( Instinct ) अशा दोन ज्ञानसाधनांचा निरनिराळे प्राणी कमी-अधिक उपयोग करीत आलेले दिसतात. पैकीं कीटकसृष्टींत उपजत प्रेरणेचा संपूर्ण परिपोष झालेला दिसतो, तर मानव-








सृष्टींत बुद्धिकौशल्यानें परिसीमा गांठलेली दिसते. अंतर्ज्ञानामध्यें या दोन्ही ज्ञानसाधनांचा समावेश होतो. उपजत प्रेरणा हें देखील बुद्धीइतकेंच किंबहुना कांहीं बाबतींत बुद्धीहूनहि प्रभावी असें ज्ञानसाधन आहे. उपजत ज्ञान बौद्धिक ज्ञानाहून कमी प्रतीचें असतें असा आपण गैरसमज करून घेतला आहे. तथापि कृमिकीटकांच्या किंवा पशुपक्ष्यादिकांच्या संस्थांचें व व्यवहाराचें सूक्ष्म अवलोकन केल्यास हा भ्रम दूर होतो. हे जीव आपलीं नियतकर्में केवळ उपजत प्रेरणेच्या बळावर इतक्या सफाईनें व चातुर्यानें करीत असतात कीं, बुद्धीच्या आश्रयानें विद्यापारंगत झालेल्या एकाद्या विशारदासहि तें करूं म्हणतां तितकें साधावयाचें नाहीं ! बौद्धिक ज्ञान हें किती म्हटलें तरी श्रमसाध्य, एकांगाचा परामर्श घेणारें ( abstract ) आणि आनुमानिक असतें. उपजत ज्ञान हें सहजसुलभ, सुमूर्त ( concrete ) आणि अचूक असतें. बुद्धि वस्तूवस्तूमधील संबंध समजून घेते व आपल्या ज्ञानाचें क्षेत्र वाढवीत जाते. उलट, उपजत प्रेरणेचें लक्ष प्रत्येक वेळीं आपल्या विषयावरच केंद्रित झाल्यामुळें तिचें ज्ञान तुटक व मर्यादित असतें; याचा अर्थ उपजत ज्ञान बिनचूक असलें तरी मर्यादित; उलट बौद्धिक ज्ञान विस्तृत असलें तरी अनिश्चित असतें. यामुळें अखिल वस्तुजाताच्या व्यापक प्रदेशावर बुद्धीची नजर फिरत असली तरी सृष्टीच्या अंतरंगांत ती शिरूं शकत नाहीं. उलट पक्षीं, उपजत प्रेरणा रहस्यग्राही असली तरी ज्ञानविषयाचा प्रदेश ती वाढवूं शकत नाहीं. करितां बुद्धि आणि प्रेरणा या दोहोंचाहि समावेश करूं शकणाऱ्या तिसऱ्या ज्ञानसाधनाची तत्त्वजिज्ञासूला आवश्यकता आहे. अंतर्ज्ञान ( Intuition ) ही उणीव भरून काढूं शकेल.

### मनोमय सृष्टि

अंतर्ज्ञानाची प्रचीति घ्यावयाची असेल आणि तिच्या द्वारा जगताचें रहस्य समजून घ्यावयाचें असेल तर बाहेर पहावयास शिकलेली बुद्धि अंतर्मुख करून आपल्या मनाचेंच अवलोकन करावें. सृष्टीचें प्रवाही आणि अखंड रूपांतर पावणारें स्वरूप येथेंच आपल्या प्रथम दृष्टीस पडेल. कारण मन म्हणजे कांहीं एकादें जड द्रव्य नव्हे, किंवा मनोऽवस्थांची अथवा चित्तवृत्तींची मालिका म्हणजेहि मन नव्हे. मन ही एक अविरत स्थित्यंतर पावणारी प्रक्रिया आहे. भूत-वर्तमानकालांतील अनुभवसरणींच्या योगें ती अधिकाधिक समृद्ध व नित्य ‘न्यारी’ बनत जाते. अनुभवांच्या या संचितालाच आपण स्वभाव म्हणतो. परंतु मनाचें हें ‘संचित’ नित्य ‘प्रारब्धां’त प्रवेश करीत असल्यानें आपल्या व्यक्तित्वाला सदोदित नव्या नव्या छटा प्राप्त होत असतात. ही नवनवोन्मेषशालिनी मनःप्रक्रिया केव्हांहि थांबत नाहीं. भवमानता ( Duration ) म्हणजेच ‘सतत होत राहणें’ हा तिचा स्वभाव आहे. तींत कालतत्त्वाचा अंतर्भाव होत असला तरी तिचें यथार्थरूप कालातीत आहे. कालकल्पना हें आपण रचलेलें एक प्रतीक आहे. भवमानता ही निरपेक्ष वस्तुस्थिति आहे. तींत भूतभविष्यादि भेद नाहींत. भवमानतेचें ‘क्रियापद’ नित्य वर्तमानकाळीं असून भूतकाळ पचवून तें सतत भविष्यकाळांत पडत असतें.

वरकरणीं जडमूढ दिसणाऱ्या मृण्मय सृष्टीचें अंतरंगहि असेंच प्रवाही आहे. परंतु दोन समांतर लोहमार्गावरून एकाच दिशेनें व सारख्याच वेगानें धावणाऱ्या आगगाड्यांपैकीं, जींत आपण बसलेले आहों ती धावत आहे परंतु बाहेरची गाडी स्थिर आहे असें आपणास दिसावें, त्याप्रमाणें अंतःसृष्टीची ‘भवमानता’ आपल्या प्रत्ययास येते तशी बाह्यसृष्टीची येत नाहीं. म्हणून ती आपणास स्थिर व सर्वच गुणांच्या बाबतींत अंतःसृष्टीच्या उलट तिची प्रतिपक्षी ( Inverse ) भासते. वस्तुतः भवमानता हा सर्वच सृष्टीचा स्थायिभाव आहे. सर्वच सृष्टि कालगर्भ, गतिमान्, ओघवती आणि सृजनशील आहे.

### साहचर्यवाद ( Parallelism )

असें असतांहि मनोव्यापार मुळांत शारीरिक आहेत आणि भौतिक घटनांप्रमाणें कार्यकारणसंबंधानें जखडलेले आहेत असा आग्रह अधिभूतवादी धरितात याचें कारण विशिष्ट पद्धतीनें विचार करण्याची बुद्धीची खोड सहजासहजीं जात नाहीं हेंच होय. अधिभूतवादी म्हणतात कीं, जो कार्यकारणाचा व मूलशक्तीच्या अविनाशित्वा-(Conservation of Energy )चा कायदा सर्व मृण्मय आणि शारीर सृष्टीला लागूं आहे, त्यास मनोव्यापाराचा अपवाद करणें प्रशस्त नाहीं. मनोव्यापार हे मेंदूच्या व्यापाराचे प्रतिभास अथवा गौण आविष्कार ( Epi-phenomena ) असतात.










अथवा इतकें तरी खरें कीं कोण्यातरी गूढ कारणाच्या योगानें एकाच गोष्टीच्या दोन भाषांतील अनुवादाप्रमाणें हे दोन्ही प्रकारचे व्यापार एकमेकांशीं तंतोतंत समांतर ठेवून वागत असतात. त्यामुळें तितकी अलौकिक बुद्धि प्राप्त होईल तर आपणासहि मेंदूमधील घडामोडी पाहून त्यांशीं संगत असणारे मनोव्यापार न पाहतांहि ताडतां येतील. शिवाय मनोमय सृष्टि तिच्यापुरती स्वतंत्र मानली तरीदेखील तीमधील अंतर्घटना कार्यकारणतत्त्वाला सोडून घडणें शक्य नाहीं.

परंतु वरील सिद्धान्त खरा नाहीं. कारण, एक तर 'मूलशक्तीचें अविनाशित्व' किंवा 'कार्यकारणसंबंध' हीं भौतिक शास्त्रांचीं केवळ गृहीततत्त्वें आहेत. तीं निखालस सिद्ध आहेत असें नव्हे किंवा मनोमय सृष्टीलाहि तीं बंधनकारक आहेत असेंहि नव्हे. किंबहुना मनोमय सृष्टींत क्रियास्वातंत्र्य हेंच अनुभवसिद्ध असून कार्यकारणकल्पनाच उलट त्यामधून निपजली आहे! म्हणजे मनोमय सृष्टि स्वतंत्र असून शारीर व्यापार हेंच तिचे प्रतिभास किंवा आविष्कार आहेत असें म्हणावयास जागा आहे. बरें, साहचर्याचा सिद्धान्त ( Parallelism ) म्हणावा तर तोहि अल्पांशानेंच खरा आहे. कांहीं ठळक पण अगदीं थोड्याच ठिकाणीं व तेंहि अधूनमधूनच मनोघटनांचें आणि मेंदूतील घटनाविघटनांचें साहचर्य दिसून येतें. एरवीं मनोघटनांचा प्रांत स्वतंत्र आणि मेंदूच्या हालचालींना पुरून उरण्याइतका विशाल आहे. उदाहरणार्थ, स्मृतिदोषाच्या अभ्यासानें असें सिद्ध झालें आहे कीं, स्मृतिभ्रंश निव्वळ मानसिक स्मरणशक्तीच्या ऱ्हासामुळेंहि घडून येऊं शकतो. याचा अर्थ स्मृतीला शारीरिक पर्याय असला आणि संवयी-( Habits ) च्या रूपानें तो दृग्गोचर होत असला तरी 'स्मृति' ही मूलतः व्यापक स्वरूपाची शुद्ध मानसिक प्रक्रिया आहे. शिवाय मनोव्यापार शरीर-व्यापारावर अवलंबून आहेत असें घटकाभर मान्य केलें तरी त्यांचें स्वरूप एकच आहे, असें सिद्ध होत नाहीं. साहचर्याचा सिद्धान्त शास्त्रज्ञांना सोयीचा वाटला म्हणून ते तो हवा तर मानोत; त्याची तात्त्विक भूमिका मात्र जों जों विशद करावी तों तों ती हेत्वाभासयुक्त असल्याचें दिसून येतें. दुसरें असें कीं, मृण्मय सृष्टीशीं जडलेल्या संबंधामुळें मनाच्या परिघावर कांहीं ठिकाणीं थिजलेल्या संस्कारांचीं कांहीं थोडी पुटें चढलेलीं दिसलीं, आपल्या आचरणाचा मार्ग पुष्कळ ठिकाणीं शारीर-स्मृतीनें म्हणजेच संवयीनें आंखलेल्या चाकोरींतून जात असला आणि बहुतेकदां शिक्षणानें व विचारानें प्राप्त झालेल्या ठराविक कल्पनांच्या अनुरोधानें जरी आपण वागत असलों तरी मूलतः आत्मस्वातंत्र्य खरें आहे. आपलें वर्तन हें स्वभाव व अवांतर गोष्टींवर अवलंबून असतें असें कितीहि आग्रहपूर्वक म्हटलें तरी कोणता मनुष्य केव्हां कसा वागेल याचें भाकीत करितां येत नाहीं; कर्म घडून गेल्यावर त्याचें वर्णन तेवढें करितां येतें ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे.

## सृजनशील उत्क्रान्ति

## ( Creative Evolution )

बाह्य सृष्टीशी जुळतें घेऊन जीवनहेतु साध्य करण्याची जबाबदारी बुद्धीवर असल्यामुळें बाह्य जगताकडे ती सदैव साध्य-साधनदृष्टीनें पहात असते. अन्नमय सृष्टीप्रमाणें प्राणमय सृष्टीकडे पाहण्याचाहि तिचा दृष्टिकोण हाच असतो. 'निसर्गनियमानुसार ठरलेला पद्धतशीर बदल' असें उत्क्रान्तीचें वर्णन करणारा साधनवाद ( Mechanism ) अथवा पूर्वनियोजित साध्यानुसार घडत जाणारा बदल असें वर्णन करणारा साध्यवाद ( Finalism ) ह्या दोन्ही विचारसरणी बुद्धीच्या ऱ्हस्व दृष्टींतूनच उत्पन्न होतात. त्यामुळें उत्क्रान्तीचीं हीं दोन्हीं वर्णनें असमर्पक ठरतात. कारण उत्क्रान्तीची दिशा भूतकाळानें ठरविलेली नाहीं. त्याप्रमाणें भविष्यकाळांतहि ती ठरलेली नाहीं. जीवनशक्तीचा विकास यंत्रक्रियेप्रमाणें कारणांतून कार्यांत व्हावा अथवा मंत्रक्रियेप्रमाणें संकल्पांतून सिद्धींत व्हावा अशा कोणत्याहि प्रकारें उत्क्रान्तीचें तंत्र ठरलेलें नाहीं. जीवनतत्त्वा-( Elan Vital )ची उत्क्रान्ति 'इकडून तिकडे' किंवा 'मागून पुढें' अशी होत नसून अंतःस्फूर्तीनुसार आंतून बाहेर अनिश्चित नावीन्यांत होत असते. उत्क्रान्ति हा जीवजाताच्या आंतरिक सहजस्फूर्तींचा परिणाम आहे. तो बाह्य परिस्थितीवर अवलंबून नाहीं कीं पूर्वनियोजित उद्दिष्टानेंहि बांधलेला नाहीं. उत्क्रान्तीच्या मार्गांत जीवनतत्त्व कोणकोणत्या जीवयोनींचा आकार धारण करील अथवा व्यक्तिगत जीवनामध्यें कोणकोणते आडे-








वेढे घेईल हें तंतोतंत ठरलेलें नाहीं. आजपावेतों ही जीवनशक्ति मिळेल त्या मार्गानें सरळ किंवा आडवाटेनेंहि फुलत उमलत आलेली दिसते. यापुढेंहि ती तशीच बेहोषपणानें व अनिश्चितपणानें विकसित होत जाईल. जीवसृष्टीमध्यें वनस्पति, कीटक, पशुपक्षी आणि मानव आदिकरून जे जीवप्रकार व जे जीवनप्रकार उत्क्रान्त झालेले दिसतात, ते कोणत्याहि ठराविक संकल्पाच्या अनुरोधानें अथवा निव्वळ कार्यकारणभावानुसार एकापुढें एक अशा पद्धतीनें आविर्भूत झालेले नाहींत. हे विविधप्रकार म्हणजे उत्क्रान्तीच्या तितक्या भिन्न प्रणाली अथवा तितके वेगळाले प्रयोग आहेत. त्यामुळें उत्क्रान्ति ही प्रगतीच आहे असें निश्चयेंकरून म्हणतां येत नाहीं. एवढें वरीक दिसतें कीं प्रत्येक जीवकोटीमध्यें व्यष्टि व समष्टीच्या हितसंबंधांचा झगडा चालू असून मानवामध्यें मात्र या दोहोंचें यथोचित तादात्म्य बनण्याचा संभव दिसत आहे. अशा प्रकारें व्यक्ती व समाज यांच्यामध्यें सामरस्य उत्पन्न होणें हेंच नीतीचें उद्दिष्ट असतें. त्यामुळें उत्क्रान्तीचा व्यवहार नीतीस परिपोषक आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

## नीति आणि धर्म

सहानुभूति हें नीतीचें अधिष्ठान आहे. केवळ बुद्धिनिष्ठा हा नीतीच्या विकासांतील फक्त एक टप्पा आहे. जसें नीतीचें उगमस्थान तसें तिचें उद्दिष्टहि बुद्धीच्या पलीकडे आहे. जमातीच्या जीवितास जें उपकारक तें नैतिक. समाजभावना हीच नीतिभावना होय. नीतीचा हा दंडक बौद्धिक विवेचनानें प्राप्त झालेला नसून सहजप्रेरणेनेंच ठरवून ठेवला आहे.

प्रारंभीं जमातीच्या जीवितानें जें कोणतें रूप धारण केलें असेल तें तें अबाधित राखणें एवढेंच नैसर्गिक प्रेरणेचें कर्तव्य असतें. नीतीचें प्राप्तव्य मात्र इतकेंच तोकडें नाहीं. केवळ एका विशिष्ट जमातीचें नव्हे तर अखिल मानवजातीचें जीवित विशाल व प्रगल्भ करणें हेंच नीतीचें अंतिम उद्दिष्ट होय. प्रारंभीं, नीति केवळ रक्षणशील ( Conservative ) असते; पुढे ती प्रगमनशील होत जाते. जुनी नीति प्रेरणाजन्य आहे. नवी नीति अंतर्ज्ञानावर आधारली जाईल.

धर्माचेंहि असेंच आहे. केवळ बुद्धीचें मार्गदर्शन पत्करल्यामुळें जेथें जेथें व्यक्ती हताश व समाज विस्कळीत होण्याचा संभव असतो तेथें तेथें धर्मभावना जागरूक राहून आत्मविश्वास आणि संघवृत्ति उत्पन्न करिते. धर्माचींहि स्वरूपें दोन – स्थितिधर्म व गतिधर्म. पहिला रक्षणशील, दुसरा विधायक. पहिला बहिर्मुख, दुसरा अंतर्मुख. पहिला प्रेरणाप्रधान, दुसरा अंतर्ज्ञानात्मक. पहिला समाजविशिष्ट, दुसरा मानवतावादी. हीं दोन्हीं धर्मस्वरूपें आपापल्या परीनें बुद्धीपलीकडे असतात. पहिलें अ-प्रबुद्ध (infra-rational) म्हणून, दुसरें अति–बुद्धिक (supra-rational) म्हणून. धर्माचीं कमी-अधिक बुद्धिनिष्ठ स्थित्यंतरें या दोहोंमध्यें येऊन जातात.

मनुष्यजातीविषयीं सहानुभूति हेंच धर्माचें व नीतीचें मर्मस्थान आहे. सहानुभूति हीच नीति आणि सहानुभूति हीच तत्त्वज्ञानाची पद्धती असल्यामुळें सत्यज्ञानहि नीतीस उपकारकच होतें. उत्क्रान्ति आणि तिचें ज्ञान जसें नीतिपरिपोषक तसें परम आनंदकारकहि असतें. सर्वसामान्य जीवितकर्मांतून उद्भवणाऱ्या सुखापेक्षां अभिजात कर्तृत्वाचा, आणि विवेचक बुद्धीला प्रतीत होणाऱ्या निस्तेज व निर्जीव सृष्टीपेक्षां सहानुभवी अंतर्दृष्टीस तिच्या रसरशीत व उत्क्रमणशील स्वरूपाचा जो प्रत्यय येतो त्याचा आनंद कांहीं और असतो.

## हास्याची उपपत्ति

बर्गसननें हास्याच्या उपपत्तीचें अत्यंत मूलगामी व विस्तृत विवेचन केलें आहे. येथें फक्त त्याचा थोडक्यांत उल्लेख करतों. जिवंत आणि प्रभवनशील सृष्टीवर बुद्धि जड मूढतेचा आरोप करूं लागली म्हणजे तात्त्विक हेत्वाभास उद्भवतात; त्याचप्रमाणें समाजांतील एखादा माणूस जणुं आपला जिवंतपणा तात्पुरता विसरून जेव्हां एखाद्या निर्जीव यंत्राप्रमाणें वागूं लागतो, तेव्हां हास्य उत्पन्न होतें. हास्य हें नेहमींच बुद्धिनिष्ठ, मानवी आणि सामाजिक असतें. ज्ञानक्षेत्रांतील भास आणि हेत्वाभास दूर करणें हें अंतर्दृष्टीचें काम; तसें व्यक्तीला तऱ्हेवाईकपणें वागूं न देतां ताळ्यावर ठेवणें हें हास्याचें प्रयोजन होय.









अनुक्रमणिका

डॉ. ल. ह. टेंगशे

# गुरुदेव टागोर

कवीला स्रष्टा व द्रष्टा म्हणतात तें उगीच नाहीं. **शांतिनिकेतन** म्हणजे टागोरांचें शैक्षणिक 'काव्य' होय असें म्हटल्यास तें सत्यकथनच होईल. स्वप्नाळू जगांत रमणारा कवि शिक्षणतज्ज्ञ कसा झाला ही एक आश्चर्यकारक कथा आहे. ग्रीक पुराणांतील एका विचित्र कथेप्रमाणेंच शांतिनिकेतनाचा इतिहास आहे. ग्रीक पुराणांत एकदां सौन्दर्याच्या चढाओढीसाठीं दोनतीन देवता पृथ्वीतलावर येतात. पृथ्वी त्यांचा स्पर्श होतांच फुलते व खुलते, रंगीबेरंगी फुलें उत्पन्न होऊन एकंदर वातावरणच स्वर्गीय बनतें. टागोरांच्या स्पर्शामुळें शांतिनिकेतन असेंच स्वर्गीय झालें. पश्चिम बंगालमधील बीरभूम जिल्हा खडकाळ व रूक्ष म्हणून प्रसिद्ध आहे. अशा 'निरस्तपादप' भागांत चोऱ्या व मारेकरी वावरत. अशा नीरस व भयानक जागेंत गुरुदेवांनीं एक अरण्याश्रम तयार केला. अतिशय मेहनतीनें पाणी आणून जिकडेतिकडे बागबगीच्याचें स्वरूप आणलें. सुरवातीला लहानशी वाटणारी शाळा आज जगप्रसिद्ध विद्यापीठ झालें आहे. तेथील शिक्षणप्रयोगावर जगाचें लक्ष केंद्रित आहे. कविश्रेष्ठ टागोर यांना गुरुदेव म्हणतात ते सार्थ आहे.

## स्वतःचे अनुभव व दृष्टिकोण

रवींद्रनाथ यांना लहानपणीं शाळेंतील अनुभव फार कडु स्वरूपाचे आले. त्यांच्या या अनुभवांतच नवीन शिक्षणतत्त्वांचा जन्म झाला. नवीन वक्ता जसा स्टेजला घाबरतो त्याप्रमाणें शाळा म्हणजे कोंडवाडा, तुरुंग असें वाटून शाळा चुकविण्याचे त्यांनीं नानातऱ्हेचे प्रयोग केले! आपल्याला देवानें धष्टपुष्ट कां निर्माण केलें याचा त्यांना राग येऊं लागला. कारण, आजारी म्हणून शाळा चुकविणें अशक्य होऊन बसलें. आपल्याला पडसें तरी यावें म्हणून बऱ्याच वेळां ते आपलें बूट व पायमोजे पाण्यांत घालून ठेवीत असत. पण त्यांच्या वाटेला आजार येईना. पावसाळ्यांत ते बाहेर भिजत व कपडे पावसांत भिजवून घेत. आजाराची ही सर्व प्रार्थना फुकट गेली! घरीं शिकवायला मास्तर येत. ते अगदीं नियमित. त्यांच्या कुटुंबांत कधीं कोणी आजारी पडलें नाहीं व शिकवणीला कधींहि खाडा पडला नाहीं.

टागोरांना प्रचलित शिक्षणसंस्था आवडल्या नाहींत हें उघड आहे. शिक्षणासंबंधीं त्यांनीं आपल्या अपेक्षा 'Personality' या इंग्रजी ग्रंथांत मांडल्या आहेत त्या अशाः

सर्वांगीण उन्नति हें शिक्षणाचें ध्येय असलें पाहिजे. पूर्वी आयुष्य गुंतागुंतीचें नसल्यामुळें शिक्षणानें मनुष्याची वाढ सर्व बाजूंनीं सारख्या प्रमाणांत होत असें. पुढें पुढें शारीरिक, बौद्धिक व आध्यात्मिक शिक्षणांत विसंगति उत्पन्न झाली. शिक्षण याचा अर्थ शरीर व बुद्धि यांना निरनिराळा ताण देणें असा होऊं लागला. मुलांच्या डोक्यांत कोणची तरी माहिती कोंबावी म्हणजे शिक्षण– अशी आकुंचित कल्पना रूढ झाली.

टागोरांची आध्यात्मिक जगावर संपूर्ण श्रद्धा आहे. हें आध्यात्मिक जग या जगापासून वेगळें नाहीं. अध्यात्म हें याच जगाचें अंतिम सत्य होय. पूर्वी अरण्यांत ऋषींचे आश्रम असत. त्यांची स्मृति आजहि मनाला चटका लावते. हे आश्रम म्हणजे हल्लीच्या अर्थी शाळाहि नव्हत व मठहि नव्हत. ह्या आश्रमांत घरगुती वातावरण होतें. शिक्षणाचा उद्देश जीवन शुद्ध होऊन ईश्वरचरणीं विलीन होणें किंवा मुक्त होणें हाच होता. आश्रम जरी अरण्यांत असले तरी सामाजिक जीवनाशीं त्याचा जिव्हाळ्याचा संबंध असे. पृथ्वी वगैरे ग्रहांना सूर्य जसा जीवनदाता त्याप्रमाणेंच सर्व समाजाला स्फूर्ति देण्याचें कार्य आश्रम करीत असत. लहान मुलांनाहि गृहस्थाश्रमांत प्रवेश करण्यापूर्वी अनादि व अनंत जीवनाचा साक्षात्कार या आश्रमांत घडत असे.

प्राचीन काळीं शिक्षणसंस्था व उच्च जीवन यांमध्यें तफावत नसे. गुरूच्या जीवनस्फूर्तीमुळें आश्रमांत विद्यार्थ्यांचा विकास होत असे. वेदाभ्यास असला तरी










त्यांत जडत्व नसे. मठ किंवा धर्ममंदिरांतील एकांगी जीवनहि नसे. विद्यार्थी पुस्तकी अभ्यासाशिवाय इतर वरीच कामें करीत असत. ते जनावरांना चरावयास नेत, जळण गोळा करीत व प्राणिमात्रांना सहानुभूतीनें वागवीत. गुरूंच्या सहवासांत त्यांचा मानसिक व आध्यात्मिक विकास संपूर्ण घडून येत असे. प्राचीन आश्रम ही कामगिरी करूं शकले याचें कारण त्यांचा मुख्य उद्देश शिकविणें हा नसून उच्च जीवनाची आकांक्षा असलेल्या तरुणांना आश्रय देणें हा होता.

गुरुशिष्यांचें हें नातें काल्पनिक नसून सत्यसृष्टीचें यथार्थ वर्णन आहे हें पटण्यास आपण पूर्वीच्या पाठशालांकडे नजर टाकावी. हल्लींच्या सरकारी नियंत्रणाची धाड ह्या बिचाऱ्या पाठशाळेवरहि येत नसे. संस्कृतमध्यें जिला 'चतुष्पाठी' म्हणतात तिलाच हल्लीं आपण विद्यापीठ संबोधितों. चतुष्पाठींत शाळेच्या वातावरणाचा वासहि शिवत नसे. विद्यार्थी मुलांसारखे गुरुगृहीं वावरत. जेवणखाण, वसति, अभ्यास यावद्दल फी नसे. शिक्षक आपला अभ्यास करीत. राहणी कमालीची साधी असे. शिक्षक धंदा म्हणून शिकवीत नसत. ते आपल्या जीवनाचा एक धर्म किंवा कर्तव्य म्हणून विद्यादान करीत.

### विश्वभारतीचें ध्येय

प्राचीन आश्रमांतील शिक्षणाविषयींची कल्पना टागोरांना मनापासून पटली. गुरुशिष्यांनीं एकत्र राहून उच्च जीवन जगावें हें शिक्षणाचें मुख्य सूत्र सत्यसृष्टींत उतरविण्याचा त्यांनीं सदैव प्रयत्न केला. प्रथम लहान प्रमाणांत शांतिनिकेतन येथें त्यांनीं शाळा काढली. नंतर १९२१ सालीं आपलीं उद्दिष्टें टागोरांनीं जनतेसमोर मांडलीं तीं थोडक्यांत पुढें दिलीं आहेत. तीं आजहि आवश्यक, उपयुक्त व आचरणीय आहेत हें दिसून येईल.

( १ ) **पौर्वात्य संस्कृतीचा अभ्यास :** पाश्चात्त्य राजवटींत पौर्वात्त्य धर्माचा व संस्कृतीचा अभ्यास नीट होत नसे. तो शांतिनिकेतनमध्यें सुरू झाला. चीनभवन नांवाची एक सुंदर इमारत हल्लीं शांतिनिकेतन येथें आहे. त्या ठिकाणीं चिनी भाषेचा, संस्कृतीचा, बुद्धधर्माचा वगैरे अभ्यास चालतो.

( २ ) **ग्रामोद्योग :** श्रीनिकेतन येथें ग्रामोद्योगकेंद्र उघडण्यांत आलें. यंत्राच्या स्वस्त व मोठ्या प्रमाणांतील मालामुळें हिंदुस्थानचे कलाकौशल्यपूर्ण धंदे नाश पावत आहेत; त्यांना पुनर्जन्म देण्यासाठींच श्रीनिकेतनची स्थापना झाली. येथें कुशल चर्मकार, विणकरी व कुंभार वगैरे कारागीर कलेकडेच लक्ष देऊन वस्तू निर्माण करतात. टागोर हे गांधींसारखे वास्तववादी नव्हते. ते या ग्रामीण धंद्यापासून होणाऱ्या नफातोट्याकडे दुर्लक्ष करीत.

हल्लीं हस्तव्यवसायाचें महत्त्व सर्वांना पटलें आहे. शिक्षण एकांगी होणें फारच वाईट. पंचेंद्रियांना काम मिळाल्यास मनाचा नीट विकास होतो. केवळ वाचन व लेखन केल्यामुळें अंगीं एककल्लीपणा बाणण्याचा संभव असतो. कांहीं प्रकारच्या वेडावर उपचार म्हणून हस्तव्यवसायाची योजना डॉक्टर करतात. क्लफ हा इंग्रजी कवी मानसिक त्रासामुळें वेडा झाला असता. पण त्यानें नर्स फ्लॅरेन्स नाइटिंगेलच्या हाताखालीं रोग्यांसाठीं पार्सल बांधणें वगैरे हातकाम करून वेडाची विकृति चुकविली. यांशिवाय हस्तव्यवसायानें व्यायाम, सर्वांगीण उन्नति, जातिभेदनिर्मूलन वगैरे अनेक चांगल्या गोष्टी साधतां येतात.

( ३ ) **जागतिक ऐक्य :** जगाकडे पाहिलें तर दोन अभेद्य तट पडलेले दिसतील. पाश्चिमात्त्य जगांत शास्त्रांची भयंकर प्रगति झाली आहे व त्यामुळें शास्त्रीय दृष्ट्या मागासलेल्या पौर्वात्त्य देशांना तुच्छ मानण्यांत येते. पौर्वात्त्य अर्धगोलांत प्राचीन काळीं अध्यात्माचा सखोल अभ्यास व संशोधन झालेलें आहे. जगाच्या कल्याणासाठीं जगांतील पौर्वात्त्य व पाश्चिमात्त्य राष्ट्रांनीं एकमेकांशीं सहकार करावा. पाश्चिमात्त्य राष्ट्रांनीं धर्म व नीतीचा अभ्यास सुरू करावा. उलट पौर्वात्त्य राष्ट्रांनीं पाश्चिमात्त्य राष्ट्रांकडून शास्त्रीय माहिती मिळवावी. जगांतील प्रत्येक जबाबदार व्यक्तीनें 'वसुधैव कुटुम्बकं' ही वृत्ति अंगीं बाणविण्याचा प्रयत्न करावा.

आपण हायड्रोजन बॉम्बच्या युगांत वावरत आहों. हल्लीं युद्धाला पर्यायशब्द म्हणून सर्वनाश किंवा प्रलय द्यायची पाळी आली आहे. सर्व जग शांति कीं सर्वनाश या पेंचप्रसंगांत सांपडलें आहे. अशा स्थितींत टागोरांनीं सुचविलेल्या जागतिक ऐक्याशिवाय तरणोपाय नाहीं.

टागोरांची ही जागतिक ऐक्याची व व्यापक स्नेहभावाची कल्पना आचरणांत आणणें आज किती आव-







श्यक आहे हें आपणांस विचाराअंतीं पटेल. आपण दुसऱ्याची थट्टा, हेटाळणी, द्वेष करतों याचें खरें कारण अज्ञान. अज्ञान दूर झालें कीं पूर्वग्रह नष्ट होतात आणि सहानुभूति व प्रेम यांचा पाया घातला जातो. अज्ञान दूर होण्यास प्रवास किंवा देशपर्यटन हें एक साधन आहे. साधा प्रवास करतां करतां, अज्ञानाचा अंमल जगावर किती विस्तृत आहे याची कल्पना येते. रशिया व चीन देशांत गेल्याशिवाय नफा म्हणजे एक सामाजिक गुन्हा आहे व विषम वांटपाचें नफा हें द्योतक आहे हें कसें पटणार ? साम्यवाद नसलेल्या देशांत नफ्याशिवाय एक काडीदेखील हलणें शक्य नाहीं असें आपल्याला साहजिकच वाटतें. चिनी लोकांची बटणछाप चपटीं नाकें पाहून आपणांस हसूं येते. चीनमध्यें गेल्याशिवाय आपलें मोठें नाक पाहून ते लोकहि नाक कसें मुरडतात हें आपणांस कळणार नाहीं. सैतानाचें नाक मोठें असतें अशी त्यांची समजूत आहे. इंग्लंड व आयर्लंडमधील तेढ तर प्रसिद्ध आहे. आयरिश लोकांची अशी एक व्याख्या देण्यांत येते कीं त्यांना आयर्लंड आवडतें अशांतला भाग नाहीं; त्यांना इंग्लंडबद्दल मात्र संपूर्ण तिटकारा आहे; स्वर्गांत जर द्वारपाल म्हणून इंग्रज भेटला तर आयरिश मनुष्य नरक सुखानें पत्करील असें म्हणतात. इंग्लंड व फ्रान्सची स्थिति अशीच आहे. हे दोन देश अगदीं जवळ आहेत. या देशामध्यें कांहीं ठिकाणीं तर केवळ २० मैल रुंदीचा समुद्र आहे. असें असतानांसुद्धां एकमेकांबद्दल कमालीचें अज्ञान आहे. स्वयंपाकशास्त्र, नाजूकपणा व कौशल्य याबद्दल फ्रान्स प्रसिद्ध आहे. बेडूकापासूनहि सुंदर व रुचकर पदार्थ फ्रेंच पाकशास्त्री तयार करतात. याचा अर्थ प्रत्येक फ्रेंच नागरिक तीनत्रिकाळ बेडूक खातो असा नाहीं. पण अशी निराधार समजूत इंग्रज लोकांनीं करून घेतली होती. फ्रान्स म्हणजे बेडूकखाऊ अशी पुष्कळांची कल्पना होती. इंग्लंडसंबंधीं असेच गैरसमज फ्रान्समध्यें परवापरवापर्यंत पसरले होते. १९ व्या शतकांत एका खेडेगांवाच्या जत्रेंत निशेच्या भरांत व संसाराला वैतागून एकदोन इंग्रजांनीं आपल्या बायका विकल्या. यामुळें पत्नीविक्रय हा इंग्लंडमध्यें रूढ प्रघात आहे अशी कल्पना फ्रेंचांनीं करून घेतली होती.

अज्ञानांधकारांत गैरसमजुती फैलावतात हें वरील उदाहरणावरून स्पष्ट होईल. गैरसमजुतीमुळें कलह व कलहामुळें युद्ध म्हणजेच सर्वनाश अशी मालिका आहे. याकरतां सर्वत्र मित्रभाव निर्माण होणें अवश्य आहे. हल्लीं मनुष्याच्या सेवेला शास्त्रानें प्रचंड शक्ति दिली आहे. दळणवळणाचीं साधनें सुलभ, सुखकर व जलद झालीं असल्यामुळें निरनिराळ्या देशांतील अंतर नाहींसें होत चाललें आहे. जागतिक ऐक्य निर्माण करण्याची संधि व आवश्यकता आज आहे हें ध्यानांत ठेवून त्यांसाठीं झटत राहणें हें प्रत्येकानें आपलें कर्तव्य समजावें.

आदर्श शिक्षक कसा असावा यासंबंधीं गुरुदेव टागोरांचे विचार एका वाक्यांत सांगावयाचे झाल्यास, आदर्श शिक्षक पूर्वींच्या ऋषीसारखा असावा असें सांगतां येईल. उत्तम शिक्षण प्रेम व सहानुभूती-शिवाय अशक्यप्राय आहे. कलकत्ता-कॉलेजमध्यें एकदां मुलांनीं भयंकर दंगा केला होता. त्या वेळीं टागोरांनीं असें मत दिलें कीं अशा दंग्यांत चूक बहुतेक वेळां शिक्षकाकडे असते. 'लालयेत् पंच वर्षाणि दश वर्षाणि ताडयेत्' ही म्हण चुकीची आहे. शिक्षकाची निवड करतांना काळजी घेतली पाहिजे; जीं माणसें स्वभावतःच जेलर, ड्रिलसार्जंट, मारून भुतें काढणारे यांच्यासारखीं असतील अशा लोकांच्या ताब्यांत लहान मुलें देऊं नयेत. मुलें वयानें लहान असणारच. तीं मोठ्या माणसाप्रमाणें समजूतदार कशीं असणार ? अशा अज्ञ व कोवळ्या मनांबद्दल ज्यांना आदर आहे असेच लोक शिक्षकाच्या कार्याला पात्र आहेत. 'क्षमा वीरस्य भूषणं' हें संस्कृत सुभाषित शिक्षकांना मनापासून पटलेलें असावें. विद्यार्थी हे आपले मित्र आहेत ही भावना नीट रुजली पाहिजे.

डॉ. मॉंटेसरी ह्यांचे विचारहि असेच आहेत. शिक्षकांना त्या 'नेते' मानतात. मुलें उपजत चांगलीं असतातच अशी त्यांची श्रद्धा आहे. मुलांना स्वतंत्रपणें रमूं द्यावें किंवा काम करूं द्यावें. कुठें कांहीं अडलें तर मदतनीस म्हणून शिक्षकानें हात पुढें करावा. ईश्वर आपलीं लेकरें नीट संभाळीत असतो. शिक्षकानें खोटें वळण व व्यर्थ उठाठेव यांपासून अलिप्त राहण्या-चा प्रयत्न करावा.

पूर्वीं मुलांच्या चांगुलपणावर शिक्षणतज्ज्ञांचा विश्वास नसे. मुलें आपोआप वाढूं दिलीं तर तीं चोऱ्या, मारा-








माऱ्या करतील, यापेक्षां आपण ज्ञान देऊन शिस्तीच्या जोरावर एकाच सांच्याचीं मुलें तयार केली तर काय वाईट, असें त्यांना वाटे. या वृत्तीमुळें शिस्तीच्या नांवाखालीं मुलांचें व्यक्तिमत्त्व भरडलें जाई. उदरभरण हेंच शिक्षणाचें ध्येय समजत. एकदां टागोरांनीं लहान मुलांना पटेल अशा रीतीनें शिक्षणाचें ध्येय समजावून दिलें. ते म्हणाले : "मुलांनो, तुम्ही सर्वजण आमच्याकडे येतां, तीं बीजाप्रमाणें असतां; बीज भरडलें तर पीठ, भाकरहि होईल. नीट पालनपोषण केल्यास बीजामधून प्रचंड वृक्षहि निर्माण करतां येईल. तुम्हाला शिकवितांना आमचा उद्देश तुम्हाला पोट भरावयास शिकविणें हा नसून तुमची सर्वांगीण वृद्धि व्हावी हा आहे."

### निसर्गप्रेम

पृथ्वीला आपण मातेसमान मानतों पण व्यवहारांत या मातेपासून दूर राहण्याचा प्रयत्न सतत चालू असतो. पादत्राण हा एकप्रकारचा पडदाच आहे. त्याच्या आडोशाला राहून पृथ्वीवर प्रेम करणें अशक्य आहे. एका संस्कृत श्लोकांत म्हटलें आहे कीं पृथ्वी कातड्यांनीं पांघरण्यापेक्षां पायांत पादत्राण घातलेलें बरें. रवींद्रबाबू म्हणतील कीं ही सर्व उठाठेव कशाला? ईश्वरानें आपणांस स्पर्शज्ञ असे नाजूक पाय दिले आहेत. पादत्राणें घालून खुर असलेल्या पशूसमान होण्याचा आपण मुद्दाम प्रयत्न करतों. '**नौकाडुबी**' या कादंबरींत एक विनोदी वृद्ध गृहस्थ म्हणतो : "रमेशबाबू, ही बुटाची कल्पना आपली दिसते. आपण काय वाटेल तें समजा. पण हा भ्रष्टाचार आहे. स्वतःचे पाय व मातृभूमि यामध्यें अंतराय उभा करणारा मनुष्य देशद्रोहीच समजावा. राम आणि सीता यांनीं डॉसन कंपनीचे बूट वापरले असते तर लक्ष्मण त्यांच्या बरोबर वनवासांत १४ वर्षें खास गेला नसता." (प्रकरण २८).

भौगोलिक परिस्थिति व संस्कृति याचा निकट संबंध आहे असा टागोरांचा सिद्धांत आहे. युरोपमध्यें समुद्र बऱ्याच देशांना लागून असल्यामुळें निसर्गाकडे पहाण्याचा युरोपिअनांचा दृष्टिकोण आपल्याहून भिन्न आहे. मनुष्य व निसर्ग यांमधील कलह युरोपिअनांना लवकर जाणवतो. त्यामुळें तद्देशीय वाङ्मयांत भूमि व सागर, मानव व ईश्वर यांमधील विरोधांना बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. उलट, इकडे स्थिति अगदीं निराळी आहे. उत्तर हिंदुस्थानांतील सपाट व सुपीक मैदानावर मानवाला विश्वांत विरोध दिसणें कठीण झालें. उपजीविकेचें साधन, परलोकचिंतन वगैरे सर्व गोष्टी अरण्यांत शांतपणें चालू असत. परिस्थिति भिन्न किंवा विरुद्ध आहे असें वाटण्याचें कारणच नव्हतें. प्राचीन आर्य सत्यशोधन करूं लागले तेव्हां विश्वांत त्यांना संवादित्व आढळलें. हिंदी संस्कृतीवर आश्रमांचा शिक्का मारला गेला आहे. याउलट युरोपीय संस्कृतीवर सागराचा संपूर्ण पगडा आहे.

बोलपूर या रूक्ष स्थळीं बागबगीचा निर्माण करतांना कवीच्या मनांत आश्रमप्रेम व तज्जन्य विश्वप्रेम यांची प्रेरणा होती. आजहि जर आपण शांतिनिकेतनला गेलों तर कालिदास वगैरे संस्कृत कवींनीं वर्णन केलेलीं झाडें, वेली, फळें, फुलें यांपैकीं बरीचशीं आपल्या दृष्टीस पडतात, निसर्गाची हालचाल व मधुर आवाज आपल्याला बोलावीत आहे असा भास होतो. शहरवासी गोरा जसा निसर्गाच्या आकर्षणानें मुग्ध झाला ('गोरा' कादंबरी प्रकरण २१) तशीच आपलीहि शांतिनिकेतनमध्यें स्थिति होते.

झाडाखालीं शिक्षण चांगलें. तें अशक्य झाल्यास इमारत तरी निसर्गरम्य स्थळीं बांधावी, असें टागोरांचें मत होतें. डिकन्सनें एका शाळेचें जें वर्णन फार बहारीनें केलें आहे, तें आठवतें : "त्या शाळेंत १०–१२ वर्षांत भिंतींना रंग लावलेला नव्हता. दर वर्षी मुलें आपल्या दोंती भिंतीवर रिकाम्या करीत. शेवटीं मूळचा पांढरा रंग फारच थोडा शिल्लक राहिला. आकाशांत सर्व रंग निळा व मधून मधून शुभ्र तारका ज्याप्रमाणें चमकतात तसेच पांढऱ्या रंगाचे ठिपके दिसूं लागले." बऱ्याच शाळेच्या इमारती लहान व रूक्ष असतात. त्या पाहिल्या कीं बऱ्याच लोकांना सैनिकांच्या बराकींची आठवण होते. पूर्वीं छडीचा उपयोग सर्रास चालू असतांना शाळा तुरुंगासारखी वाटणें स्वाभाविक आहे. शाळा म्हणजे खरोखरीं सरस्वतीमंदिर. मंदिराला शोभेल अशी जागा व इमारत पाहिजे. आपलीं सर्व धर्मक्षेत्रें निसर्गस्थळीं असतात. अथांग सागर किंवा गगनचुंबी पर्वत पाहिला कीं मनुष्याचें मन विकास पावतें व अध्यात्माकडे धावूं लागतें. रम्य निसर्गशोभेचा मनावर चांगला परिणाम होतो. म्हणून शिक्षणसंस्थेची इमारत निसर्गरम्य स्थळीं असणें इष्ट आहे हें पटेल.





अनुक्रमणिका

## शिक्षण म्हणजे सर्वांगीण प्रगति

शिक्षण म्हणजे पोपटपंची नव्हे. अर्थशून्य व घोकंपट्टी म्हणजे शैक्षणिक काळाबाजार होय. पदवी मिळविण्याची ही चोरवाट अत्यंत तिरस्करणीय आहे. रवीन्द्रबाबू म्हणतात : " इंग्लंडमध्यें पूर्वी चोरीबद्दल फांशीची शिक्षा असे. हिंदुस्थानांतील विद्यापीठांनीं याहीपेक्षां कडक कायदा केला आहे ! विद्यार्थ्यानें चोरी जर केली नाहीं तर तो नेस्तनाबूद व्हायचा. मजकूर न समजतां पाठांतर म्हणजे चोरी नव्हे तर काय ? परीक्षेच्या हॉलमध्यें पुस्तक कपड्यांत लपवून आणलें काय किंवा न कळता डोक्यांत खुपसलें काय हिशोब एकच ! " ('विश्वभारती' त्रैमासिक, मे–ऑक्टोबर १९४७, पृ. ४ ).

महाकवि शेक्सपिअरचें मत असेंच आहे : "चोवीस तास पुस्तकांत तोंड खुपसणाऱ्या लोकांना पुस्तकी ज्ञानाशिवाय काय मिळणार ? जगाच्या व्यवहारांत या ज्ञानाचा काय उपयोग ? " तसेंच किपलिंग या आधुनिक इंग्रजी कवीला पुस्तकी ज्ञानाचा भयंकर तिटकारा असे. त्यानें एका कवितेंत टॉमलिन्सन नावांच्या पुस्तकी साहेबाचें व्यंग-शब्द-चित्र रेखाटलें आहे. हा साहेब मरतो व परलोकांत यमदूत त्याची झडती घेतात; त्याला विचारतात : "तुला मित्र होते कीं नाहीं ? " टॉमलिन्सन – " नाहीं, पण एका पुस्तकांत मी वाचलं आहे कीं मित्र चांगले असतात. " दुसरा प्रश्न जरा नाजूक होता : " कांहो आपण प्रेम कधींतरी केलं आहे का ? " " छे, छे. पण एका लेखकानें केलेलं प्रेमाचं वर्णन मी वाचलेलं आहे. " शेवटीं दूत चिडून विचारतात : " पुण्य सोडा, पण निदान पाप तरी आपण केलेत कीं नाहीं ? " " छे, छे, पण पाप काय आहे याची माहिती मला पुस्तकावरून ...... " दूत खवळतात व त्यांना या पुस्तकी साहेबांत जीव आहे कीं नाहीं याचीच शंका येते. या साहेबाला ते मोठ्या किसणीवर ठेवून घासतात. हळूं हळूं त्याच्या अंगांतून कागद, दऊत, शाई वगैरे निघूं लागतात! किसणीखाली पाहतात तों कांहींच शिल्लक नाहीं ! या गृहस्थाला स्वतःचा अनुभव असा कोणताही नव्हता.

शांतिनिकेतन हा ज्ञानाचा कारखाना नसून प्राचीन आश्रमाचें प्रतीक होय. रवींद्रबाबू विद्यार्थ्यांशीं बोलतां बोलतां एकदां म्हणाले : " शिक्षण म्हणजे सर्वांगीण प्रगति. जीवनसाफल्य हेंच महत्त्वाचें ध्येय. इतर ध्येयें गौण स्वरूपाचीं आहेत. खरें मानव्य मानसिक व आध्यात्मिक प्रगतींत सांठविलेलें आहे. उच्च आशा व आकांक्षा सत्यसृष्टींत उतरविण्यासाठीं कायावाचामनेंकरून झटणें म्हणजेच खरें शिक्षण. " –
('Towards the Future' या व्याख्यानावरून).

शिस्त व पद्धतशीरपणा असल्याशिवाय कोणतेंहि कार्य नीट पार पडणार नाहीं. परंतु हल्लीं शिस्तीचें स्तोम पूर्वीपेक्षां फार कमी झालें आहे. कडक शिस्तीनें पौरुष अंगीं बाणतें ह्या समजुतीनें पूर्वी शिक्षणक्रम चाले. त्यामुळें कांहीं मुलें गुंड व बरीचशीं मुलें भित्रीं बनत. फाजील शिस्तीमुळें बऱ्याच मुलांमध्यें लाजाळूपणा, परावलंबित्व वगैरे दुर्गुण अंगीं बळावतात, हें डॉ. मॅाँटेसरीबाईनीं सोदाहरण दाखविलें आहे. अंध आज्ञाधारकपणा व शिक्षकाकडून होणारा सामाजिक अपमान या दोहोंचाहि अनिष्ट परिणाम होतो. नैतिक बळ नाहींसें होऊन मुलें पंगूप्रमाणें वागतात. अर्वाचीन शिक्षणपद्धतींत शिस्तीपेक्षा मनोरंजनाला अधिक महत्त्व आहे. खेळत, खेळत मुलांनीं शिकावें व सहकार करून पूर्वयोजित कार्य करावें म्हणजेच शिक्षणाचें ध्येय साधेल. लहान मुलें व कॉलेज-विद्यार्थी यांना निरनिराळ्या रीतीनें वागवावें लागतें. लहान मुलांना शिकवितांना त्यांचें कुतूहल जागृत करणें हेंच मुख्य काम. वेळ साधून शिक्षणाचा डोस हळूंच पाजावा लागतो. " मुलांच्या मनांत विषय घोळत नसतांना एकदम शिकवणं म्हणजे भूक नसतांना अन्नदान करण्यापैकीं आहे. अशा अन्नादानामुळें भूक नसतांना अपचन अशी केविलवाणी स्थिति निर्माण होते. " ('गोरा ' प्र. २३)
कॉलेजच्या प्रौढ विद्यार्थ्यांना निराळ्या रीतीनें जपून वागवावें लागतें. शाळेच्या कोंडवाड्यांतून तीं नुकतींच मोकाट सुटलेलीं असतात. स्वतंत्र हालचालीची व विचारसरणीची त्यांना एकदम हाव सुटते. कोणतीच गोष्ट मनाला पटल्याशिवाय स्वीकारूं नये असें त्यांना वाटतें. लहान मुलांना दांत आल्यावर हातांत येईल त्या वस्तू तीं चावतात, त्याचप्रमाणें कॉलेजचे विद्यार्थी लहानसहान मुद्द्यावर तुटून पडतात. ह्या अवस्थेला ' मानसिक दंतसमय ' असें विनोदी नांव टागोरांनीं दिलें आहे. अणुमात्र अपमान अशा मुलांना बेचैन करून












सोडतो. उद्धट वाटणारीं मुलें प्रेमाचा स्पर्श होतांच अगदीं निराळ्या रीतीनें वागतात. कॉलेजच्या प्राध्यापकांनीं शिस्तीचें निर्दय यंत्र बनून वागूं नये. मुलांचें प्रेम संपादन केल्यावरच त्यांना सुधारणें शक्य आहे.

## नीतीला पोषक वातावरण

एका फ्रेंच लेखकानें लबाड मनुष्याचें वर्णन 'इहलोकांत भ्याड पण परलोकांत शूर!' असें केलें आहे. असत्य म्हणजे ईश्वराचीच फसवणूक अशी श्रद्धा निर्माण झाल्याशिवाय लहान मुलांना चांगलें वळण लागणार नाहीं. देऊळ, चर्च, मशीद आणि अशाच धार्मिक संस्था मनुष्यांत अध्यात्माची स्मृति जागृत करतात आणि प्रार्थना व जप या मार्गांनीं मनुष्य उच्च पातळीवर जाऊं शकतो. या संस्थांमुळेंच जीवनांतील सत्य, सदाचार, बंधुत्व हीं चिरंतन मूल्यें आपल्या नजरेसमोर नेहमीं राहतात. धार्मिक किंवा नैतिक शिक्षणाला हल्लीं पूर्ण फांटा दिला जातो एवढेंच नव्हे तर अशा शिक्षणाची कुचेष्टा वारंवार ऐकूं येते. आकाश-पाताळ एक करून, नैतिक वा अनैतिक मार्गांनीं ऐहिक यश मिळविणें हेंच अनेकांचें हल्लीं ध्येय आहे. हल्लीं आपली नैतिक उंची असावी तितकी उंच नाहीं. बेलॉक यांनीं उपरोधानें जें लिहिलें आहे तें आठवतें. ते म्हणतात : "हल्लीं ज्या लोकांना आपण अत्यंत यशस्वी समजतों त्यांचा अनीति हाच पाया आहे. ज्याच्याजवळ भरमसाट पैसा आहे अशा माणसाला आपण यशस्वी समजतों. हा भरमसाट पैसा एकदम मिळवायचा लबाडीशिवाय दुसरा मार्ग नाहीं. लबाडी हाच शिकण्यालायख विषयांचा राजा आहे. ह्या विषयांत जो नापास झाला त्याच्या कपाळीं जन्मभर काबाडकष्ट करीत कुठेतरी कोपऱ्यांत खितपत पडणें हें ठरलेलें. परंतु सर्वांत गमतीची गोष्ट म्हणजे हा महत्त्वाचा विषय शाळेंत व कॉलेजांत अजिबात शिकवीत नाहींत! परीक्षेंत अत्यंत यशस्वी झालेले विद्यार्थी समाजांत एकदम मागें पडतात. कारण जगांत अक्षरशत्रु, लबाड लोक फसविण्याच्या कामांत तरबेज असतात." या म्हणण्यावरून नैतिक शिक्षणाची आपलीं ध्येयेंच बदलण्याची किती जरुर आहे हें स्पष्ट होतें.

नीति व धर्म निव्वळ शिकविल्यामुळेंच विद्यार्थ्याला पटेल व आपली कार्यसिद्धि होईल, असें रवींद्रबाबूंना केव्हांच वाटलें नाहीं. शिक्षणांत शिक्षक हाच महत्त्वाचा घटक आहे. शिक्षकांचें विषयांवरील प्रेम व ज्ञान, शिकविण्याची हौस व सदाचार यांमुळेंच मुख्यतः वातावरण निर्माण होतें. शांतिनिकेतनाला महर्षि व गुरुदेव यांच्यासारखे महात्मे लाभले व पहिल्यापासूनच उच्च तऱ्हेचें वातावरण निर्माण झालें. एकदा गांधीजींना टागोरांनीं लिहिलें : "ही संस्था आपल्या आश्रयाखालीं असूं दे. विश्वभारती ही माझी जीवन-नौका आहे." गांधीजींनीं उलट कळविलें : "एका पुण्यात्म्याची ती कृति आहे म्हणून ईश्वरानेंच तिला अभयदान दिलें आहे."

## मानवतेचा पाया

इंग्लंडमध्यें शॉ व वेल्स यांना मागील पिढीचे शिक्षक मानण्यांत येतें. परंतु या दोघांत शिक्षणाविषयीं संपूर्ण मतभिन्नता आहे. वेल्सना वाटे कीं "जगांत शिक्षणाचा प्रसार झाला कीं सुवर्णयुग सुरू होईल. जगांतील प्रत्येक मनुष्यानें केंब्रिज बी. ए. डिग्रीचा शिक्षणक्रम आत्मसात् करावा व शास्त्रीय ज्ञान मिळवावें; जगांत ऐक्य निर्माण करून ह्या ज्ञानाचा फायदा सर्व मानवजातीला पोहोंचेल अशी व्यवस्था असावी." शॉचे विचार याच्या अगदीं उलट आहेत. त्याच्या मतें दुसऱ्याला शिकविण्याची कल्पना भ्रममूलक आहे; मुलें घरीं दंगा करतात म्हणूनच लोक त्यांना शाळेंत पाठवितात. शाळेपेक्षां तुरुंग बरा अशी त्यांची खात्री होती. कारण "पूर्वी शाळेपेक्षां तुरुंगांत स्वातंत्र्य अधिक असे. शिवाय जेलरनीं लिहलेलीं पुस्तकें वाचण्याची सक्ती तुरुंगांत नसते. शाळेंत मात्र शिक्षकांनीं तयार केलेलीं रद्दी पुस्तकें वाचण्याची सक्ती असते." शिक्षकाविषयीं शॉ म्हणतात : "ज्याला कांहीं जमतें, तो काम करतो; ज्याला कांहीं जमत नाहीं, तो शिकवितो."

टागोर यांचीं मतें शॉ व वेल्स यांच्या मतांपेक्षां अगदीं निराळीं आहेत. वेल्सनीं शास्त्रीय ज्ञानाला फाजील महत्त्व दिलें. शॉ व्यक्तिवादी असल्यामुळें कोणत्याच शिक्षणाला महत्त्व देत नाहींत. आल्डस हक्सूले यांनीं जीं पाश्चिमात्य शिक्षणाचीं मूलभूत तत्त्वें सांगितलीं आहेत तीं टागोर यांच्या मताप्रमाणेंच आहेत. आल्डस हक्सलेंना जुन्या वळणाची शिस्त पसंत नाहीं. "ज्ञान, अनुभव व व्यक्तित्व यांचा जिवंत समन्वय झाला पाहिजे. या समन्वयाचा पाया मानसशास्त्र नसून मानवता असला पाहिजे". ('Ends & Means').










प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# नवचीनची नवीन राज्यघटना

१९४९ मध्यें चीनमधील साम्यवादी क्रान्ति यशस्वी होऊन चीनमध्यें जनतेच्या प्रजासत्ताका-(People's Republic)ची स्थापना झाली. त्यानंतरच्या काळांत चिनी जनतेला जे अनुभव आले त्यांच्या अनुरोधानेंच चीनच्या नवीन राज्यघटनेचा आराखडा रेखाटण्यांत आलेला आहे. क्रान्तिकारक नवचीनच्या वाटचालीचें प्रतिबिंबहि या राज्यघटनेंत आढळून येतें. राज्ययन्त्राच्या प्रत्यक्ष रचनेपेक्षां त्या रचनेमागील राजकीय प्रेरणांचें आपल्या दृष्टीनें अधिक महत्त्व आहे.

या राज्यघटनेचा पहिला कच्चा आराखडा माओ — त्से-तुंग यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या चिनी साम्यवादी पक्षाच्या एका समितीनें तयार केला. या आराखड्यावर नंतर एका खास राज्यविधानसमितीनें संस्करण केलें. यासाठीं या समितीनें जवळजवळ आठहजार लोकांचें म्हणणें विचारांत घेतलें. या सर्व विचारविनिमयानंतर ११ जून १९५४ रोजीं या समितीनें राज्यघटनेचा आपला आराखडा निश्चित केला. हा आराखडा जनतेच्या माहितीसाठीं व खुल्या चर्चेसाठीं १४ जून रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला.

## क्रान्तीचें आजचें स्वरूप

राज्यघटनेच्या या आराखड्याच्या प्रास्ताविका-(Preamble)मध्यें चीनमधील क्रान्तीचें आजचें स्वरूप दिग्दर्शित करण्यांत आलेलें आहे. चीनमधील साम्यवादी क्रान्तीनें साम्राज्यशाही, सरंजामशाही व भांडवलशाही या तिहींचाहि पराभव केला. परंतु साम्यवादाची पुरती स्थापना अद्याप तेथें व्हावयाची आहे. चिनी क्रान्तिकारकांना याची जाणीव आहे. साम्यवादाच्या परिणत अवस्थेला जाऊन पोहोंचेपर्यंत आजच्या क्रान्तीला कांहीं संक्रमणकाळांतून जाणें आवश्यक आहे हें त्यांनीं ओळखलें आहे. जमिनीचें फेरवांटप व अमेरिकेच्या विरोधाला आजवर केलेला यशस्वी प्रतिकार या चिनी क्रान्तीच्या महत्त्वाच्या जमेच्या बाजू आहेत. नियोजित अर्थव्यवस्थेची बरीचशी पायाभरणी आजवर चीनमध्यें पुरी होत आलेली आहे. शेती, लहान उद्योगधंदे, भांडवलप्रधान मोठे उद्योगधंदे व व्यापार यांच्या व्यवस्थेंत हळूहळू साम्यवादी परिवर्तन घडवून आणवून क्रान्ति पूर्ण करणें हें चिनी जनतेपुढचें आजचें ध्येय आहे.

रशियाशीं आजच चीनचे दृढ असे स्नेहसंबंध आहेतच. समता, परस्परसाहाय्य व राष्ट्रांच्या प्रादेशिक सार्वभौमत्वाला मान्यता या तत्त्वांवर आधारलेले मैत्रीचे संबंध चीनला सर्व राष्ट्रांशीं जोडावयाचे आहेत. आन्तरराष्ट्रीय राजकारणांत जागतिक शांतता व मनुष्यमात्राची प्रगति यांविषयीं चीन प्रयत्नशील राहील.

राष्ट्रांतील निरनिराळ्या प्रादेशिक विभागांना आर्थिक व सांस्कृतिक विकासासाठीं सर्व साहाय्य मिळेल. परंतु संकुचित प्रादेशिक अभिमानाला उत्तेजन मिळणार नाहीं व फुटीर वृत्तींचा तर बीमोड करण्यांत येईल.

प्रास्ताविक भाग (Preamble) स्पष्ट नीट शब्दांत लिहिलेला आहे. आपल्या ध्येयाची निश्चित कल्पना व त्याचबरोबर आपल्या आजच्या मर्यादांची जाणीव चिनी साम्यवाद्यांना असल्याचें त्यांत दिसून येतें. रशियाशीं स्नेहाचें धोरण आज कृतींत आहे तेंच उक्तींत सांगण्यांत आलें आहे. प्रादेशिक विभागाविषयींचें धोरण रशियन वळणाचेंच आहे. जागतिक शांतता व मनुष्यमात्राचा विकास हीं साम्यवादी प्रचाराचीं चलनी नाणींच पुन्हां वापरण्यांत आलीं आहेत. परंतु संक्रमणकालाची आवश्यकता मान्य करण्यांत आलेली आहे. टप्प्याटप्प्यांनींच साम्यवादी क्रान्ति पुरी होईल ही जाणीव बाळगली

'Full Text of the Draft Constitution of the People's Republic of China' (–circulated by the Embassy of the People's Republic of China)-च्या आधारें.








आहे. लहान उद्योगधंद्यांचें अर्थव्यवस्थेंतील स्थानहि लक्षांत घेण्यांत आलेलें आहे. यावरून अतिरेकी उत्साहाच्या आहारीं चिनी क्रान्तिकारक गेलेले नाहींत असें आढळून येईल.

## कांहीं मूलभूत सूत्रें

राज्यघटनेच्या पाठीशीं असणारीं कांहीं सामान्य सूत्रें ( General Principles ) यानंतर सांगण्यांत आलीं आहेत. त्यांतील महत्त्वाचीं सूत्रें अशीं :

( १ ) चिनी जनतेचें प्रजासत्ताक हें अनेक राष्ट्रकां-( Nationalities )चें एक केंद्रित राष्ट्र राहील. या राष्ट्रकांचा दर्जा समान राहील. त्यांना मिळणाऱ्या वागणुकींत भेदाभेद केले जाणार नाहींत. या राष्ट्रकांनीं आपापल्या भाषांचा विकास करावा. आपले रीतिरिवाज, आचार व धर्मश्रद्धा या बाबतींत स्वतःला योग्य वाटेल तें धोरण त्यांनीं आंखावें.

कोणत्याहि राष्ट्रकाला चीनमधून फुटून बाहेर पडण्याला हक्क असणार नाहीं.

( २ ) सरकार आणि समाज यांच्या प्रयत्नानें पायरीपायरीनें साम्यवादी क्रान्ति पुरी करण्यांत येईल. यासाठीं आवश्यक तें साम्यवादी परिवर्तन खालील मार्गानें करण्यांत येईल :

( अ ) राष्ट्रीयीकरण : राष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्या कांहीं भागांचें राष्ट्रीयीकरण करण्यांत येईल व या भागाच्या विकासाकडे लक्ष पुरविणें हें सरकारचें एक प्रमुख कर्तव्य राहील.

( आ ) सहकारी संस्था : लहान शेतकरी व लहानलहान उद्योगधंदे सहकारी तत्त्वावर चालविण्या-चे प्रयत्न केले जातील. अशा सहकारी संस्थांना सरकारचें पुरेपूर साहाय्य मिळेल. कारण यांतूनच साम्यवादी परिवर्तन पुरें व्हावयाचें आहे.

( इ ) शेतकऱ्याचा आपल्या जमिनीवर व इतर मालमत्तेवर मालकी हक्क राहील. लहानलहान कारागीरांचाहि त्यांच्या उत्पादनाच्या साधनांवर व इतर मालमत्तेवर मालकी हक्क राहील. या सर्वांनीं सहकारी तत्त्वावर काम करून उत्पादन वाढवावें. यासाठीं सरकार त्यांना उत्तेजन देईल.

श्रीमंत जमीनदारांच्या बाबतींतील मात्र त्यांचें कार्यक्षेत्र हळूहळू कमी करून अखेर त्यांचें उच्चाटन करण्याचें सरकारचें धोरण राहील.

( ई ) खाजगी भांडवलदारांचाहि उत्पादनाच्या साधनांवर व इतर मालमत्तेवर मालकी हक्क राहील. उपयोजन, नियंत्रण व परिवर्तन हीं खाजगी भांड-वलाच्या कार्यक्षेत्राबाबतच्या सरकारच्या धोरणाचीं मुख्य सूत्रें राहतील. या क्षेत्रांतून जेवढें चांगलें निष्पन्न होण्यासारखें असेल तेवढें करून घ्यावें असें सरकारचें धोरण राहील. परंतु खाजगी भांडवलदार जर राष्ट्र-विघातक भूमिका स्वीकारतील तर त्यांना तसें करूं दिलें जाणार नाहीं.

( ३ ) सर्व नागरिकांना खाजगी मिळकत करण्याचा हक्क आहे. अशी मिळकत वारसाहक्कानें वंशपरंपरा चालत राहूं शकेल.

( ४ ) सरंजामी जमीनदार व भांडवलदार यांना राजकीय हक्क मिळणार नाहींत. परंतु त्यांच्या उप-जीविकेचीं साधनें कांहीं विशिष्ट काळपर्यंत पूर्णपणें हिरावून घेतलीं जाणार नाहींत.

( ५ ) नियोजित अर्थव्यवस्थेचा अवलंब आर्थिक विकासासाठीं करण्यांत येईल.

यांखेरीज राष्ट्ररक्षण, नागरिकत्वाची भूमिका, कामाची व कामकऱ्यांची महती या विषयींचीं कांहीं सूत्रें आहेत. परंतु तशा प्रकारचीं सूत्रें प्रकट वा अप्रकट-पणें आज बहुतेक सर्व राष्ट्रांच्या राज्यघटनांतून किंवा राज्यव्यवहारांतून मान्य करण्यांत आलेलीं आहेत. वरील इतर सूत्रांतून, संक्रमणावस्थेंत आवश्यक असणारी योग्य ती सावधगिरी बाळगलेली दिसते. खाजगी भांडवलदारांच्या कमाल उत्पन्नावर एखादी मर्यादा घालण्यांत येणार आहे काय याचा स्पष्ट उल्लेख कोठें दिसत नाहीं. वरील चौथ्या क्रमांकांतून तसें सूचित होतें. परंतु अशी मर्यादा घातल्यास त्यांना उत्पादनासाठीं प्रोत्साहन ( incentive ) कोणतें राखण्यांत येणार आहे ? कीं शासनाचा बडगा हेंच ? — याचा खुलासा होत नाहीं. धर्माचारासाठीं देण्यांत आलेलें स्वातंत्र्यहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

## विधिमंडळें

राज्ययंत्राची उभारणी निवडणुकींच्या आधारावर व्हावयाची आहे. वयांत आलेल्या ( १८ वर्षें ) प्रत्येक स्त्री-पुरुष नागरिकाला मतदानाचा हक्क मिळेल. हे मतदार स्थानिक, प्रान्तिक व केन्द्रीय विधिमंडळांतील सभासदांच्या निवडणुका करतील. एखादा सभासद








त्याच्या मतदारसंघाला नकोसा झाला तर त्याला परत बोलाविण्याचा अधिकारहि मतदारांना देण्यांत आलेला आहे. हीं विधिमंडळें त्या त्या विभागाचें मंत्रिमंडळ निवडतील व त्या मंत्रिमंडळावर त्यांचा ताबा राहील. खालच्या श्रेणीच्या मंत्रिमंडळावर व विधिमंडळावर त्याहून वरच्या श्रेणीच्या मंत्रिमंडळाचा व विधिमंडळाचा अधिकार चालूं शकेल. या रीतीनें केन्द्रीय मंडळापर्यंत सत्तेचें केन्द्रीकरण होत जाणें अटळ आहे असें वाटतें. निवडणुकांची पद्धति किंवा वेगवेगळया घटकांनीं करावयाचा अधिकाराचा वापर याविषयीं तपशीलवार माहिती आराखड्यांत दिलेली आढळत नाहीं. तो तपशील कदाचित् अखेरची घटना तयार होतांनाच भरण्यांत येईल.

केन्द्राच्या ठिकाणीं एक राष्ट्राध्यक्ष व एक उपराष्ट्राध्यक्ष असेल. राष्ट्राध्यक्षाची जागा ही अधिक शोभेचीच वस्तू असल्याप्रमाणें वाटते. प्रधानमंत्र्याच्या हातांत राष्ट्राध्यक्षापेक्षां प्रत्यक्ष सत्ता अधिक राहील. परंतु या पदांवर असणाऱ्या व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावानुसार हा अधिकाराचा कांटा या बाजूला किंवा त्या बाजूला झुकण्याचा संभव आहे. मंत्रिमंडळ व राष्ट्राध्यक्ष यांच्यावर अखेरचें नियंत्रण मध्यवर्ती विधिमंडळाचेंच ठेवलेलें आहे. या विधिमंडळाची वर्षांतून एक वेळ तरी बैठक घेतली पाहिजे अशी घटनेच्या आराखड्यांत तरतूद करण्यांत आली आहे.

याखेरीज घटनेच्या आराखड्याप्रमाणें विधिमंडळाची एक स्थायी समिति असेल. ही समिति व तिचा अध्यक्ष यांची निवड विधिमंडळ करील व तिच्यावर विधिमंडळाचेंच नियंत्रण राहील. विधिमंडळाची बैठक चालूं नसतांना विधिमंडळानें करावयाचीं सर्व कामें ही स्थायी समिति करील. मंत्रिमंडळावरहि तिचें नियंत्रण राहील. ही स्थायी समिति पुरेशी जागरूक व कार्यक्षम राहिली तर प्रत्यक्ष सत्तेचीं सूत्रें तिच्या व तिच्या अध्यक्षाच्या हातीं गेल्याखेरीज राहणार नाहींत. मंत्रिमंडळ व स्थायी समिति यांच्यांत वारंवार खटकेहि उडूं शकतील. विधिमंडळाची बैठक वर्षांतून एकदांच बोलावण्याचें स्थायी समितीवर बंधन असल्यामुळें बैठक बोलावणें तिला लांबणीवर टाकतां येईल. (दोनपंचमांश सभासद-संख्येच्या मागणीनेंहि अशी बैठक बोलावतां येईल असा एक पर्याय ठेवलेला आहे). अशी स्थायी समिति निर्माण करण्यामागील हेतु काय असावा हें नीटसें लक्षांत येत नाहीं.

## न्यायदान

न्यायदानांत कोणत्याहि रीतीचा हस्तक्षेप केला जाणार नाहीं व न्यायालयावर केवळ राष्ट्राच्या कायदेकानूंचेंच तेवढें बंधन राहील असें एके ठिकाणीं सांगण्यांत आलेलें आहे. परंतु हें प्रत्यक्षांत उतरण्यासाठीं ज्या तरतुदी आवश्यक आहेत त्या केलेल्या दिसत नाहींत. वरिष्ठ न्यायालयाचा अध्यक्ष हा मध्यवर्ती विधिमंडळानें निवडावयाचा आहे. त्याची नेमणूक चार वर्षांपुरतीच आहे व त्याला काढून टाकण्याचा अधिकारहि विधिमंडळाला आहे. कायद्यांचा अन्वयार्थ लावण्याचें कामहि विधिमंडळाच्या स्थायी समितीकडे सोंपविलेलें आहे. खालच्या श्रेणीच्या न्यायालयांतूनहि त्या त्या श्रेणीच्या विधिमंडळांचें असेंच वर्चस्व राहील. निःस्पृह न्यायदानाची शक्यता यामुळें नाहींशी होते. व न्यायालयें लोकसत्तेच्या कलानें नाचणारीं विधिमंडळांच्या हातांतील बाहुलीं होतात.

## मूलभूत हक्क व कर्तव्यें

जनतेच्या मूलभूत हक्कांत खालील हक्क नमूद करण्यांत आलेले आहेत : (१) राष्ट्राचे कायदे सर्वांना सारखेच लागू राहतील. (२) अठराव्या वर्षावरील प्रत्येक व्यक्तीला मतदान करतां येईल व निवडणुकीला उभेंहि राहतां येईल. ज्यांच्याविषयीं विशेष कायदे करून त्यांचे हे हक्क हिरावून घेण्यांत आले असतील त्या व्यक्तींची गोष्ट वेगळी. (३) भाषणस्वातंत्र्य, प्रचारस्वातंत्र्य, संघटनास्वातंत्र्य, धर्माचारस्वातंत्र्य. (४) न्यायालयाच्या किंवा ( Procurator ) सर्व खात्यावर देखरेख करणाऱ्या एका विशेष अधिकाऱ्याच्या आज्ञेशिवाय कोणालाहि अटक होणार नाहीं (५) कोणत्याहि गृहांत आक्रमण केलें जाणार नाहीं. खाजगी पत्रव्यवहार फोडला जाणार नाहीं. (६) प्रत्येकाला काम, विश्रांति, व वार्धक्यांत किंवा आजारीपणांत पुरेशी सुरक्षितता मिळेल. या गोष्टी क्रमाक्रमानें अधिकाधिक प्रमाणांत साध्य व्हाव्यात यासाठीं राष्ट्र सतत प्रयत्नशील राहील. (७) सर्व क्षेत्रांत स्त्री-पुरुषसमानता. (८) विवाहसंस्था व कुटुंबसंस्था यांचें संरक्षण. (९) न्याय व शांतीची प्रस्थापना यांसाठीं झगडून निर्वासित








झालेल्या लोकांना चीनमध्यें आसरा मिळेल. ( १० ) कर देणें, राष्ट्रीय मालमत्तेचा सांभाळ करणें, राज्यघटनेच्या अनुसार आपलें वर्तन ठेवणें व मातृभूमीच्या रक्षणासाठीं सैनिक म्हणून उभें रहावयास सिद्ध असणें हीं चिनी नागरिकांचीं कर्तव्यें म्हणून सांगण्यांत आलेलीं आहेत.

विवाहसंस्था व कुटुंबसंस्था यांच्या संरक्षणाचा कटाक्षानें उल्लेख करण्यांत आलेला आहे. गृहावर आक्रमण होणार नाहीं, खाजगी पत्रव्यवहार फोडला जाणार नाहीं, न्यायालयाच्या अनुमतीखेरीज अटक केली जाणार नाहीं अशीं आश्वासनें आहेत. अशा आश्वासनांना सर्वच राष्ट्रांत अनेक पळवाटा असतात आणि प्रत्यक्ष व्यवहारांत काय घडतें त्यावरच अशा आश्वासनांचें मूल्यमापन करावें लागतें. काम, विश्रांति व सुरक्षितता याविषयीं आश्वासनें देतांना आजच्या आज ती पूर्णपणें अमलांत आणता येणार नाहींत परंतु जसजसा राष्ट्राचा विकास होईल तसतशी तीं पुरीं करण्यांत येतील अशी भूमिका घेण्यांत आलेली आहे. ती व्यवहारिक समजूतदारपणाची निदर्शक नाहीं असें कोण म्हणेल ?

चीनच्या आरेखित राज्यघटनेचा असा हा आजचा आराखडा आहे. अखेरची घटना कोणत्या स्वरूपांत तयार होते व प्रत्यक्षांत ती कशी वापरली जाते यावरच अर्थात् चीनच्या राजकीय प्रकृतीचें निदान अवलंबून राहील.

---

## पुस्तक – परामर्श

**“ त्रिमूर्तिदर्शन अथवा सदाशिवराव गोवंडे यांचें चरित्र. लेखक : डॉ. वि. भा. गोवंडे. प्रकाशक : सौ. लक्ष्मीबाई गोवंडे, पुणें २ ( १९५३ ) पानें १५६ किंमत २॥ रु.**

अहेतुक जिज्ञासा हा संस्कृतीचा आत्मा आहे. सुधारलेल्या व मागासलेल्या जाती याच मुद्द्यावर तशा ठरत असतात. पूर्वजांची आठवण रानटी माणसांना नसते व सुधारलेला माणूस कौतुकानें त्यांच्या आठवणी सांगत असतो. स्वतःच्या पूर्वजांची माहिती करून घेणें याला कोणी अहेतुकपणाचें शिफारसपत्र चटकन् देणार नाहीं, कारण आत्मगौरवच त्यांत संभवतो. परंतु जेव्हां प्रस्तुत चरित्राप्रमाणें चरित्र हें कौटुंबिक सटरफटर माहितीनें सजविलेलें नसून सार्वजनिक कार्याच्या इतिहासानें भरलेलें आढळतें तेव्हां आपोआपच वरील आक्षेप उडून जातो. समाजांतील ऱ्याच लोकसमूहाला इतिहासाचें वावडें असतें. त्यांनाहि प्रस्तुत छोट्या चरित्रांतील प्रत्येक प्रकरणांत दिलेली अलग अलग दृश्यें डोळ्यासमोरून जातांना पाहून महाराष्ट्र समाजाच्या गेल्या शतकांतील इतिहासाचें एक अद्भुत चलचित्र पहात असल्याचा आनंद वाटेल. दृश्यें मोजक्या शब्दांत टिपणीवजा त्रोटक दिलेलीं असल्यामुळें रसहानि होऊन वाचक अडखळावा पण येथें उलट अनुभव वाचकांस येतो. कारण सत्य हेंच अंतिम काव्यमूल्य असतें. या छोट्या चरित्रांत अनेक अज्ञात महाराष्ट्र-इतिहासांतील विसरलेल्या गोष्टी आपणांस कळतात. डोळ्यांत न भरण्यासाठीं पण समाजाच्या हिताच्या दृष्टीनें पायाभूत अशीं कार्यें करणाऱ्या माणसांना समाज जितके ओळखावें तितके ओळखतांना आढळत नाहीं, पण महात्मा गांधींचें वैशिष्ट्य ज्यामुळें डोळ्यांत भरतें तींच कार्यें त्यांच्यापूर्वीं पाऊणशें वर्षें करणारांची थोरवी केवढीं म्हणावी ! इमारत उठविणाऱ्याचें नांव दरवाज्यावर कोरावयाचें, पण जमीन सारखी करून पाया भरणाऱ्या माणसांचें काम विसरावयाचें, असा प्रकार सामाजिक इतिहासांत अनेक वेळां दिसतो. त्याचा खोटेपणा अशा पुस्तकावरून प्रत्ययास येतो. खरें पाहूं जातां स्वतः अल्पशिक्षित असूनहि व काळ अत्यंत प्रतिकूल असतांना ज्यांनीं समाजहितकारक कार्य कोणतें याचा मनाशीं निश्चय करून त्याचा यावच्छक्य उपक्रम केला; त्यांची योग्यता नंतर यशस्वी कार्यकर्ते म्हणून ठरलेल्या माणसापेक्षां शंभरपट अधिक मानली पाहिजे व या दृष्टीनें इतिहासाची सरणी लावावयास लागलें म्हणजे मध्यंतरी अंधःकार असल्याचा जो हा खोटा आभास वावदूक चरित्रकार निर्माण करीत होते, त्यांचा नाठाळपणा मनावर ठसतो. श्रीयुत गोवंडे यांनीं टिळक, आगरकर, चिपळुणकरांच्या पूर्वींचा ५० वर्षांचा पुण्याचा सामाजिक इतिहास उजेडांत आणल्याबद्दल त्यांचे भावी इतिहासकार ऋणी होतील यांत शंका नाहीं.

– त्र्यं. शं. शेजवलकर








आचार्य शं. द. जावडेकर

# भारतीय स्वातंत्र्य आणि योगी अरविंद

**१५ ऑगस्ट** हा दिवस भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीचा दिवस म्हणून १९४७ सालापासून साजरा करण्यांत येत असतो. १८५८ सालीं ब्रिटिश पार्लमेंटानें कायदा करून ईस्ट इंडिया कंपनी विसर्जन केली आणि भारतांतील सार्वभौम सत्ता ब्रिटिश महाराणीच्या हातीं सुपूर्त केली. यावेळपासून १९४७ च्या १५ ऑगस्ट पर्यंत भारतांतील सार्वभौम सत्ता ब्रिटिश बादशहाकडे होती. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं त्याच्या आधीं महिनाभर मंजूर केलेल्या हिंदी स्वातंत्र्याच्या कायद्या-( Independence of India Act )च्या अन्वयें ब्रिटिश बादशहांनीं अखिल भारतावरील आपली सत्ता भारतांत स्थापन केलेल्या भारत व पाकिस्तान या दोन राज्यांतील घटनापरिषदांच्या हातीं दिली. या घटनापरिषदांना सार्वभौमत्वाचे सर्व अधिकार देऊन त्यांनीं आपली राज्यघटना कशीहि बनवावी आणि ब्रिटिश राष्ट्रकुलांत स्वतंत्र स्वयंशासित राज्य म्हणून राहावयाचें किंवा नाहीं तें स्वेच्छेनें ठरवावें असें जाहीर केलें. ब्रिटिश राजांचा व राण्यांचा भारतीय सम्राट् अथवा सम्राज्ञी हा किताब नष्ट झाला. भारतानें आपली राज्यघटना तयार करून त्या राज्यघटनेंत ब्रिटिश राजाला कोणतेंहि स्थान ठेविलें नाहीं आणि आपलें राज्य हें स्वतंत्र राष्ट्र व गणराज्य आहे असें जाहीर करून या नव्या राज्यघटनेची संस्थापनाहि केली. या नव्या राज्यघटनेची संस्थापना १९५१ पासून झाली. त्याच सालीं झालेल्या सार्वत्रिक निवडणुकींत प्रचंड बहुमतानें निवडून आलेला राष्ट्रसभापक्ष ( Congress Party ) आज भारतावर राज्य करीत आहे. १८५८ पासून १९४७ पर्यंतच्या काळांत भारताच्या राज्यघटनेंत ब्रिटिश पार्लमेंटानें अनेक सुधारणा केल्या तथापि त्या सर्व सुधारणा पारतंत्र्यांतील राज्यकारभारविषयक सुधारणाच होत्या. ब्रिटिश पार्लमेंटचें व ब्रिटिश राजाचें भारतावरील सार्वभौमत्व अबाधित ठेवून केलेल्या त्या सुधारणा होत्या. १९४७ सालांतच हिंदी प्रजेला सार्वभौमत्वाला मूर्त स्वरूप देणारी लोकशाही राज्यघटना त्यानंतरच स्थापन झाली. अशी प्रजेच्या सार्वभौमत्वावर उभारलेली राज्यघटना स्थापन करण्याचा हक्क १५ ऑगस्ट १९४७ रोजीं भारतीय राष्ट्रसभेच्या नेत्यांनीं ब्रिटिशांच्याकडून संपादन केला. म्हणून तोच दिवस भारतीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीचा दिवस म्हणून साजरा करणें उचित होय. पण १५ ऑगस्ट हाच दिवस **योगी अरविन्दांचा**– राष्ट्रसभेनें संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय स्वीकारावें आणि त्या स्वातंत्र्याची प्राप्ति करून घेण्यासाठीं निःशस्त्र प्रतिकाराचा आणि असहकाराचा अथवा बहिष्कारयोगाचा मार्ग तिनें स्वीकारावा असा ज्यांनीं प्रथमतः उघड प्रयत्न केला त्या **योगी अरविन्दांचा**–जन्मदिन आहे. त्यांचा जन्म इ. स. १८७२ सालीं कलकत्ता येथें **१५ ऑगस्ट** रोजीं झाला.

## तीन राजकीय आघाड्या

योगी अरविंद यांच्या वडिलांनीं आपल्या मुलांना पाश्चात्त्य संस्कृतीचें शिक्षण मिळावें म्हणून तीं अगदीं लहान असतांना त्यांना इंग्लंडांत नेऊन ठेविलें होतें. तेथें त्यांनीं सर्व शिक्षणक्रम संपवून आय्. सी. एस्. व्हावें आणि हिंदुस्थानांत येऊन थोर सरकारी अधिकारी म्हणून नांवलौकिक मिळवावा अशी त्यांच्या वडिलांची योजना होती. इंग्लंडांत केम्ब्रिज विद्यापीठांत उच्च शिक्षण घेत असतांनाच अरविंदांचे विचार क्रांतिकारक बनले. तेथील हिंदी विद्यार्थ्यांनीं 'कमल आणि खंजीर' ('Lotus & Dagger') या नांवाची एक गुप्त संस्था भारतीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं काढिली होती. त्या संस्थेचे हे सभासद बनले. पण ही संस्था लवकरच कोणतेंहि कार्य न करतां निजधामास गेली. या संस्थेच्या सभासदत्वाचा परिणाम एवढाच झाला कीं अरविंदांचे विचार पूर्णपणें क्रांतिकारक बनले आणि त्यांच्या या विचारांची चाहूल सरकारला लागल्यामुळें आय्. सी. एस्. परीक्षेतील घोड्यावर










बसण्याच्या कसोटीस ते न उतरल्याचें निमित्त होऊन त्यांना आय्. सी. एस्. अधिकारी वर्गांत प्रवेश मिळाला नाहीं. इतर कांहीं लोकांच्या बाबतींत घोड्यावर बसण्याच्या कसोटीकडे दुर्लक्ष करून अधिकारी वर्गांत प्रवेश देण्यांत आलेला होता; परन्तु अरविंदांचे विचार क्रांतिकारक असल्याचा सुगावा सरकारला असल्यामुळें त्यांच्या बाबतींत या कसोटीची अट कांटेकोरपणें पाळण्यांत आली. पुढें त्यांना बडोद्याचे सयाजीराव महाराज यांनी आपल्या संस्थानांत नोकरी दिली. सयाजीराव हे देशभक्तांचे पोशिंदे व क्रांतिकारकांचे चाहते होते. बडोद्यास राहून श्रीअरविंद यांनीं हळूंहळूं आपल्या क्रांतिकारक विचारांना मूर्त स्वरूप देण्याचें प्रयत्न सुरू केले. त्यांचे धाकटे बंधू बीरेंद्रकुमार हे सकार्यास्वामी या नांवाच्या एका संन्यासी क्रांतिकारक गुरूचे शिष्य बनले होते. हे सकार्यास्वामी १८५७ – ५८ च्या स्वातंत्र्ययुद्धांत क्रांतिकारकांच्या बाजूनें लढलेले होते. असे अनेक क्रांतिकारक संन्यासी सर्व भरतखण्डांत १९०५ – ७ सालापर्यंत संचार करून क्रांतिकारक तरुणांना व हिंदी पुढाऱ्यांना क्रांतीची दीक्षा देण्याचा प्रयत्न करीत होते. सत्तावन सालच्या क्रांतिकारक राजकारणाच्या वारश्याचा प्रवाह आणि युरोपांत शिक्षण घेऊन तेथील क्रांतिकारकांचे विचार व त्यांचीं तंत्रें आत्मसात् केलेल्या तरुणांनीं सुरू केलेल्या क्रांतिकारक आंदोलनांचा प्रवाह यांचा संगम कांहींकाळ बडोद्यास झाला होता. बडोद्यास येऊन राहिल्यानंतर अरविंदांचा संबंध मुंबई-पुण्याकडील महाराष्ट्रीय नेत्यांशीं येत गेला. मुंबईस महाराष्ट्रांतील क्रांतिकारक पुढाऱ्यांचें एक गुप्त केंद्र होतें. या केंद्रांतील पुढाऱ्यांना उदयपूर संस्थानांतील एक ठाकूर ( सरदार ) मार्गदर्शन करीत असत. हे महाराष्ट्रीय पुढारी महाराष्ट्र व मराठी संस्थानें यांत क्रांतिकारक संघटना कशी करावी याचा सल्ला देत असत. ही सर्व माहिती आतां पॉंडिचेरीच्या अरविंदाश्रमानें प्रसिद्ध केलेल्या खुद्द अरविंदांच्या लेखणींतून उतरलेल्या टिपणींच्या आधारें तयार केलेल्या पुस्तकांत प्रसिद्ध झाली आहे.

अरविंदांनीं उल्लेखिलेल्या उदयपूर संस्थानांतील हे क्रांतिकारक सरदार बहुधा श्यामजी कृष्णवर्मा यांच्या सहकाऱ्यांपैकींच कोणीतरी असावेत, असा माझा तर्क आहे. बहुधा ते एस्. आर्. राणा हे असावेत. श्यामजी कृष्ण वर्मा यांचा कांहीं संबंध पुण्यांतील रॅण्डच्या खून-प्रकरणाशीं असून त्यानंतर ते लवकरच गुप्तपणें युरोपांत जाऊन राहिले. नंतर त्यांनीं १९०५ च्या जानेवारींत एस. आर्. राणा या नांवानें एक क्रांतिकारक पॅरिस येथें राहात होते त्यांच्या सहकार्यानें ' इंडियन सोशॉलॉजिस्ट ' या नांवाचें एक वर्तमानपत्र काढिलें. याच दोघांनीं लंडन येथें ' इंडियन होमरूल सोसायटी ' या नांवाची संस्था काढिली. महाराष्ट्रांतील त्यांच्या पुढील पिढींतील क्रांतिकारक तरुण म्हणजे स्वातंत्र्यवीर सावरकर व सेनापति बापट; यांचा श्यामजी कृष्ण वर्मा व राणा यांच्याशीं निकट संबंध होता हे सबश्रुत आहे. पण त्यांच्यापूर्वी अरविंद व बीरेंद्रकुमार यांचा महाराष्ट्रीय क्रांतिकारकांशीं संबंध जडलेला असून १९०२ सालच्या अहमदाबाद येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या प्रसंगीं अरविंद घोष ह्यांनीं **लोकमान्य टिळकांची** गांठ घेतली आणि त्यांच्याशीं एकंदर हिंदी राजकारणाची सविस्तर चर्चा केली. याबेळेपासून त्यांची अशी खात्री झाली कीं भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याचें नेतृत्व करण्यास **लो. टिळक** यांच्याइतका लायक दुसरा कोणताहि पुढारी नाहीं.

अहमदाबाद कॉंग्रेसचें अधिवेशन १९०२ च्या डिसेंबर महिन्यांत भरलें होतें. १९०३ पासून तों १९१० सालीं पॉंडिचरीस जाईपर्यंतच्या काळांत अरविंदबाबूंनीं हिंदी राजकारणांत नेतृत्व संपादन करून राष्ट्रसभेला हिंदी राष्ट्रवादाची दीक्षा देण्याचा प्रयत्न केला आणि संपूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्याचें ध्येय व स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण, बहिष्कार व स्वराज्य अशी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीच्या मार्गाची चतुःसूत्री यांना राष्ट्रसभेची मान्यता मिळवून घेण्याचें राजकारण रचिलें. या राष्ट्रीय राजकारणांतील ज्येष्ठत्वाचें व मुत्सद्दीपणाचें श्रेष्ठ स्थान लोकमान्य टिळकांना दिलें पाहिजे असा त्यांचा सर्व क्रांतिकारकांना सल्ला होता. १९०४ सालीं मुंबई येथें सर हेन्री कॉटन यांच्या अध्यक्षतेखालीं डिसेंबरांत राष्ट्रसभेचें अधिवेशन झालें. या वेळीं लोकमान्य टिळक व बिपिनचंद्र पाल यांच्याबरोबर अरविंदबाबूहि अधिवेशनास हजर होते, परंतु या वेळीं ते बडोदा-सरकारच्या नोकरींत असल्यामुळें उघडपणें नेतृत्व स्वीकारीत नसत. १९०५ सालीं लो० टिळक,








बिपिनचंद्र पाल आणि लाला लजपतराय या त्रिमूर्तींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेंत राष्ट्रीयपक्षाची अधिकृत स्थापना झाली. त्यांनीं निःशस्त्र प्रतिकार आणि बहिष्कार या साधनांनीं संपूर्ण स्वातंत्र्याची प्राप्ति असें आपल्या राष्ट्रीय पक्षाचें राजकारण आंखून घेतलें आणि त्या धोरणानें अ. भा. आंदोलनास जोर चढला. याच्या पूर्वीपासूनच अरविंदबाबू हे गुप्त संस्थांच्या मार्फत सशस्त्र क्रांतीची संघटना करीत होते. पण राष्ट्रांत लाल-बाल-पाल यांच्या नेतृत्वाखालीं वंगभंगाविरुद्ध अखिलभारतीय प्रचंड आंदोलन सुरू झाल्यानंतर लवकरच त्यांनीं त्यांत उघड नेतृत्व करण्यास प्रारंभ केला आणि त्यावेळपासून त्यांच्या राजकारणांतील सशस्त्र क्रांतीच्या संघटनेचें कार्य गौण बनून तें मागें पडलें. तथापि या स्वदेशी चळवळीचें नेतृत्व करीत असतांहि आपणांस 'भावी कालांत' ('in the future') सशस्त्र क्रांति करावी लागेल हा विचार आपण फैलावीत होतों असें ते लिहितात. यासंबंधीं त्यांचा पुढील उतारा वाचनीय आहे :

"Afterwards there came the partition of Bengal and a general outburst of revolt which favoured the rise of the extremist party and the great nationalist movement. Sri Aurobindo's activities were, then, turned more and more in this direction and the secret action became a secondary and subordinate element. He took advantage, however, of the Swadeshi movement to popularise the idea of violent revolt in the future"

-- 'Sri Aurobindo on Him-self.' 43,44.

वरील उतारा लक्षपूर्वक वाचल्यास, 'सशस्त्र क्रांतीच्या दिशेनें जें पाऊल टाकावयाचें तें तूर्त तरी टाकूं नका आणि तो विचार भावी काळांत कराव्या लागणाऱ्या घटनेच्या रूपांत जिवंत ठेवा' असाच सल्ला त्यांना त्यावेळच्या ज्येष्ठ व श्रेष्ठ मुत्सद्यांनीं दिला असावा असें दिसून येईल. तूर्त संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय आणि निःशस्त्र क्रांतीच्या रूपानें करावी लागणारी बहिष्कार-योगाची चळवळ असेंच धोरण लाल-बाल-पाल यांनीं आंखून घेतलेलें असून त्याला राष्ट्रसभेकडून मान्यता मिळवून घ्यावी आणि राष्ट्रसभा ही भारतीय जनतेच्या क्रांतीची मूर्ति बनवावी असे प्रयत्न हे राष्ट्रीय पुढारी करीत होते. अरविंदबाबू या वेळच्या आपल्या राजकारणाचें स्वरूप तिहेरी होतें असें म्हणतात. त्यांतील पहिली आघाडी म्हणजे गुप्त संघटनेमार्फत भावी काळांत कराव्या लागणाऱ्या सशस्त्र क्रांतीची पूर्वतयारी ही होय. दुसरें महत्त्वाचें कार्य म्हणजे सर्वसामान्य जनतेंत संपूर्ण निर्भेळ स्वातंत्र्याच्या ध्येयाचा उघड प्रचार करून तें ध्येय साध्य करणें व्यवहार्य आहे अशी निष्ठा व्यापकत्वानें राष्ट्रांत निर्माण करणें हें होय. त्या वेळीं ब्रिटिश साम्राज्याचें सामर्थ्य एवढें प्रचंड गणलें जाई आणि हिंदी राष्ट्राची दुर्बलता इतकी निर्विवाद समजली जाई कीं निर्भेळ राष्ट्रीय स्वातंत्र्य हें एक वेड्यांचें स्वप्न आहे, अशी सर्वसामान्य समजूत होती. म्हणून राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या उघड प्रचाराची मोहीम ही दुसरी आघाडी फार महत्त्वाची होती. यानंतरची तिसरी आघाडी म्हणजे निःशस्त्र प्रतिकार, बहिष्कार अथवा असहकार यांसारख्या प्रत्यक्ष प्रतिकाराच्या चळवळीची संघटना करून तें शिक्षण जनतेला द्यावयाचें. – अशा तीन आघाड्यांवर आपलें राजकारण त्यावेळीं चालू होतें असें श्रीअरविंद घोष हे लिहितात. यांपैकीं गुप्त संघटनेमार्फत भावी सशस्त्र क्रांतीची तयारी करणें हें कार्य राष्ट्रसभेसारखी संस्था मान्य करणें शक्यच नव्हतें. दुसऱ्या व तिसऱ्या आघाडीचें कार्य राष्ट्रसभेकडून मान्यता मिळवून करूं लागावें असें लाल, बाल, पाल यांचें अधिकृत धोरण होतें व त्या धोरणानें ते आपलीं पावलें टाकीत होते. ज्यांना ही गोष्ट घडवून आणावयाची होती त्यांना गुप्त संघटनेनें व सशस्त्र क्रांतीनें तयारी करण्याचें राजकारण अनेक प्रकारें व्यावहारिक अडचणी निर्माण करीत होतें. या बाबतींत बिपिनचंद्र पाल आणि अरविंद घोष यांचे इतर सहकारी यांच्यांत तीव्र मतभेद होऊन बिपिनचंद्रांनीं 'वंदे मातरम्' या राष्ट्रीय पक्षाच्या दैनिक वृत्तपत्राच्या संपादक-मंडळांतून आपलें नांव काढून घेतलें. याच सुमारास लो० टिळक यांनीं नाशिक व बेळगांव येथील गुप्त क्रांतिकारकांना, "अविवेकानें व उतावीळपणानें वागून राष्ट्राच्या राज-

कारणांत अडथळा निर्माण करूं नका" असा सल्ला त्यांच्या गोटांत जाऊन दिल्याचें सर्वप्रसिद्ध आहे. यांपैकीं कोणतेहि पुढारी तत्त्वतः सशस्त्र क्रांतीच्या विरुद्ध नव्हते किंवा म० गांधींच्याप्रमाणें ते अहिंसेचे एकनिष्ठ उपासकहि नव्हते. परंतु आपला राजकीय कार्यक्रम निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळींतच मर्यादित करून घेतला पाहिजे असें त्यांनीं धोरण आंखून घेतलें होतें. कारण, आपल्या राष्ट्रीय चळवळीच्या त्या वेळच्या अवस्थेस अत्यंत अनुरूप असेंच तें धोरण होतें असें त्यांना वाटत होतें. यासंबंधीं अरविंदबाबू लिहितात :

" The rule of confining political action was adopted as the best policy for the National Movement at that stage and not as a part of a gospel of Non-violence or pacific idealism....Sri Aurobindo has never concealed his opinion that a nation is entitled to attain its freedom by violence, if it can do so or if there is no other way; whether it should do so or not, depends on what is the best policy, not on ethical considerations. Sri Aurobindo's position and practice in this matter was the same as Tilak's and that of other Nationalist leaders who were by no means pacifists or worshippers of Ahimsa. " Ibid. page 40, 41.

या बाबतींत तत्त्वज्ञानदृष्टीनें किंबहुना राजकीय तत्त्वज्ञानदृष्टीनेंहि म० गांधी व टिळक-अरविंद यांची भूमिका भिन्न आहे, हें खरें असलें तरी व्यवहारदृष्टीनें कोणत्याहि राष्ट्राला शक्य असेल व इतर कोणताहि मार्ग उपलब्ध नसेल तर सशस्त्र क्रांतीच्या मार्गानें स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याचा हक्क आहे व तसें त्यानें करावेंहि ही गोष्ट म० गांधींना सुद्धा अमान्य नाहीं. हिंदुस्थानासंबंधीं गांधींनींहि म्हटलें आहे :

" I would rather have India resort to arms in order to defend her honour than that she would in a cowardly manner become or remain a helpless witness to her own dishonour. But I believe that Non-violence is infinitely superior to violence. " – (Ganeshan & Co Publishers)

**Gandhi's Speeches 789**

वरील दोन उतारे ताडून पाहिल्यास त्यांतील तात्त्विक भेद व व्यावहारिक साधर्म्य लक्षांत येईल. म० गांधींची वैयक्तिक अहिंसानिष्ठा राष्ट्रसभेनें केव्हांहि स्वीकारली नाहीं. कारण आपल्या अंगीं तसा अधिकार नाहीं याची जाणीव तिला म्हणजे तिच्या थोर मुत्सद्द्यांना अखेरपर्यंत होती. तथापि अहिंसक क्रांतीचा मार्ग म० गांधी म्हणतात त्याप्रमाणें सशस्त्र क्रांतीच्या मार्गापेक्षां अनंत पटींनीं अधिक श्रेष्ठ आहे याची जाणीव गांधीयुगांत तत्त्वतः सर्व थोर राष्ट्रीय पुढाऱ्यांना झाली होती. जेव्हां दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं नेताजी सुभाषचंद्र किंवा जयप्रकाश नारायण यांनीं व्यवहारतः अन्य मार्ग स्वीकारला तेव्हांहि त्यांच्या अंतःकरणांत व उद्गारांत ही जाणीव दिसून येते आणि म्हणून त्यांनीं गांधीजींच्या अलौकिक विभूतिमत्त्वाविरुद्ध केव्हांहि कोणतीहि भावना प्रकट केली नाहीं. याच्या उलट, या मंडळींनीं त्या वेळीं आपल्या प्रामाणिकवृत्तीस अनुसरून जें राजकारण केलें 'तें माझें राजकारण नव्हे' असें गांधीजींनीं म्हटलें तरी त्यांचा निषेध त्यांनीं केला नाहीं. फक्त राष्ट्रसभेनें त्यांच्या धोरणानें जाऊं नये, निदान आपलें नेतृत्व असेपर्यंत तिनें तसें करूं नये असा त्यांचा आग्रह होता.

## अंतःप्रेरित द्रष्टेपण आणि साक्षेपी मुत्सद्दीपण

भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत केवळ साक्षेपी मुत्सद्दीपण हें जसें पुरें पडणारें नव्हतें, तसेंच केवळ अंतःप्रेरित द्रष्टेपण हेंहि पुरें पडणारें नव्हतें. लो० टिळक हें अंतःप्रेरित द्रष्टेपणाचें व असामान्य विभूतिमत्त्वाचें महत्त्व पूर्णपणें ओळखणारे पण चतुरस्त्र, साक्षेपी असे मुत्सद्दी होते. अरविंद हे अंतःप्रेरणेच्या बळावर राजकीय व्यवहार करूं पाहणारे द्रष्टे राष्ट्रनेते होते. पण त्यांच्या अंगीं टिळकांचें किंवा गांधींचें साक्षेपी मुत्सद्दीपण नव्हतें. अन्तःप्रेरित द्रष्टेपण आणि साक्षेपी मुत्सद्दीपण हे दोनहि गुण योग्य प्रमाणांत अंगीं असलेली असामान्य विभूति म्हणजे म० गांधी हेच होत. या बाबतींत

त्यांच्यासारखी विभूति शोधण्यास भारतीय इतिहासाच्या प्रवाहांत श्रीकृष्णापर्यंत मागें जावें लागेल. परतंत्र भारतांतील स्वातंत्र्याचें क्रांतिकारक राजकारण म. गांधींच्यासारख्या असामान्य व अलौकिक विभूतीच्या नेतृत्वावांचून यशस्वी होण्याचा संभव नव्हता. भारतीय क्रांति मॅझिनी किंवा लेनिन यांच्यासारख्या सशस्त्र क्रांतिवाद्यांना यशस्वी करतां येणें शक्य नव्हतें. त्याचप्रमाणें केवळ कायदेशीर व सनदशीर राजकारणाच्या बंधनांत राहून ब्रिटिश साम्राज्याच्या शृंखला तोडून भारतीय जनतेला आपल्या सर्वांगीण स्वातंत्र्याचें साध्य हस्तगत करणें शक्य नव्हतें. या दोन्हीं सिद्धांतांची जाणीव १९०५–६ सालापर्यंतच्या काळांत लो० टिळकांना पूर्णपणें झालेली होती. म्हणून अरविंदबाबूंचें अंतःप्रेरित द्रष्टेपण व त्याचें महत्त्व पूर्णपणें ओळखूनहि लो० टिळक आपल्या साक्षेपी मुत्सद्दी वृत्तीनें व असामान्य धडाडीनें राष्ट्रसभेचीं सूत्रें लोकशाही पद्धतीनें आपल्या हातीं घेऊन तिला निःशस्त्र क्रांतिवादाची दीक्षा देण्याचा प्रयत्न एका बाजूस करीत होते, तर दुसऱ्या बाजूस सशस्त्र क्रांतिकारकांना, विवेकपूर्वक आंखून घेतलेल्या निःशस्त्र क्रांतीच्या मार्गांत "उतावीळपणानें व अविवेकानें दहशतवादी बनून विघ्नें निर्माण करूं नका आणि न कळत शत्रुपक्षाच्या जाळ्यांत सांपडून सत्ताधाऱ्यांचे हात बळकट करूं नका" असा संयमाचा व दूरदृष्टीचा निःसंदिग्ध सल्ला देत होते. टिळकांच्या साक्षेपी मुत्सद्दीपणाचें रहस्य व महत्त्व अरविंदबाबूंच्यासारख्या केवळ अंतःप्रेरणेच्या बळावर व्यावहारिक राजकारणांतील डाव खेळू पाहणाऱ्या नेत्याला बरोबर समजलेलें नव्हतें याचा पुरावा १९०७ सालच्या डिसेंबरमध्यें सुरतेस भरलेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनांत घडून आलेल्या घटनांत मिळूं शकतो.

'सुरतेच्या अधिवेशनांत पहिल्या दिवशीं जी दंगल झाली त्या दंगलीचा व्यूह रचल्याची माहिती आपणांस होती व ती लो० टिळकप्रभृति ज्येष्ठ मुत्सद्द्यांस देण्यांत आलेली नव्हती आणि त्यावेळीं झालेल्या दंगलीची कोणतीहि जबाबदारी टिळकांच्यावर नसून ती असलीच तर आपणांवरच आहे' अशी स्पष्ट कबूली श्रीअरविंद घोष यांनीं सदर ग्रंथांत दिलेली आहे. यासंबंधीं अरविंदबाबूंनीं न उल्लेखिलेला थोडा तपशील असा दिसतो कीं, पहिल्या दिवशींच्या अधिवेशनांत सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं अध्यक्षाची सूचना करणारें भाषण सुरूं करतांच जी दंगल उडाली त्याची पूर्वसूचना टिळकांना नसून त्याची जबाबदारी बंगाली पुढाऱ्यांवरच निःसंशय पडते. यानंतर या दंगलीच्या धोरणाचा पूर्ण निषेध करून दुसऱ्या दिवशीं अध्यक्षाच्या सूचनेस उपसूचना मांडण्याचें कायदेशीर व सनदशीर धोरण ठरवून टिळकांनीं आपलें मुत्सद्दीपण आणि असामान्य धैर्य पणास लाविलें आणि प्रतिपक्षाच्या हुकूमशाही वृत्तीमुळें राष्ट्रसभेंत दंगल माजली असतां तिला तोंड देऊन, आपला पक्ष लोकशाही पद्धतीनें राष्ट्रसभा हस्तगत करून तिला राष्ट्रीय क्रांतीचें प्रतीक बनवूं पहात आहे, हें जगाच्या निदर्शनास आणून दिलें. दुसऱ्या दिवशींच्या दंगलींत पुढें कांहीं प्रकार झाले असले तरी दंगलीला प्रथम सुरवात लो. टिळकांच्या अंगावर खुर्ची फेकून नेमस्त पक्षाकडून झाली ही गोष्ट जवळजवळ सर्वमान्य झालेली आहे. यावेळचें टिळकांचें वर्तन हें अत्यंत धीरोदात्त आणि अचूक मुत्सद्दीपणाचें झालें अशीच साक्ष त्यावेळच्या इतिहासाला द्यावी लागेल. टिळकांनीं अधिवेशनाच्या दुसऱ्या दिवशींच्या आपल्या मुत्सद्देगिरीच्या धोरणानें राष्ट्रसभेचें अधिवेशन मोडण्यास प्रागतिक पक्षाचा हटवादीपणा आणि त्याचें हुकूमशाहीचें व दडपशाहीचें धोरण हेंच खरें कारण आहे असें दाखवून दिलें. दोन दिवस अधिवेशन मोडल्यानंतर काँग्रेस पुढें चालू ठेवण्याच्या मिषानें जे प्रतिनिधी पक्षाचें ध्येय मान्य करतील त्यांचीच एक सभा भरवून तीच काँग्रेस सभा असे ठरविण्याचा व्यूह रचिण्यांत आला. प्रागतिक पक्षानें अशा प्रकारें निःशस्त्रक्रांतिवादी व स्वातंत्र्यवादी राष्ट्रीय पक्षाला वगळून आपला स्वतंत्र सुभा उभारण्याचें ठरविलें. राष्ट्रीयपक्ष आणि प्रागतिक पक्ष यांनीं एकाच राष्ट्रीय संस्थेंत नांदून लोकशाही पद्धतीनें जो निर्णय बहुमताला मान्य होईल त्यास अनुसरून सर्व राष्ट्राच्या वतीनें परकीय सत्तेशीं प्रजेच्या स्वातंत्र्यासाठीं झगडत राहावें ही राष्ट्रसभेच्या संस्थापनेच्या वेळीं निर्माण झालेली विचारसरणी सोडून देऊन, प्रत्येक पक्षानें आपलें स्वतंत्र राजकारण आंखावें, नाहींतर प्रागतिक पक्ष ठरवील त्याप्रमाणेंच आपलें राजकारण करण्याचें वचन राष्ट्रीय पक्षानें द्यावें व वाटल्यास आपल्या








परिषदेंत यावें असा हा प्रागतिक पुढाऱ्यांचा व्यूह होता. दोन दिवस अधिवेशनांत दंगल माजल्यामुळें आपत्कालीन धोरण म्हणून आपणांस तसें करणें भाग आहे असा प्रागतिक पुढाऱ्यांचा हट्ट होता. वस्तुतः या आपत्तीचें निवारण करण्यास एक सरळ सीधा मार्ग होता. तो म्हणजे– दोनहि पक्षांच्या निवडक पुढाऱ्यांनीं एकत्र जमून गेल्या सालीं म्हणजे १९०६ च्या डिसेंबरांत कलकत्त्यास दादाभाई नौरोजी या राष्ट्रपितामहाच्या अध्यक्षतेखालीं तडजोडीनें जे ठराव करण्यांत आले होते ते या अधिवेशनांत मंजूर करण्याचें धोरण दोनहि पक्षांनीं मान्य करावें– हाच होता. अशा प्रकारची तडजोड करण्यास लो० टिळक तयार होते. परंतु फिरोजशहा मेहताप्रभृति प्रागतिक पुढारी अशी कोणतीहि तडजोड न करतां केवळ स्थानिक बहुमताच्या जोरावर आपल्या मताची प्रतिज्ञा सर्व राष्ट्रसभेवर लादण्याचा प्रयत्न करीत होते. अशा रीतीनें वागल्यास राष्ट्रीय पक्ष आपणांपासून अलग होईल आणि दोन पक्षांच्या दोन सभा बनतील हें प्रागतिक पक्षाला दिसत होतें. पण त्याला त्याची तयारी होती. अशा परिस्थितींत राष्ट्रीय पक्षानें कोणतें धोरण स्वीकारावें असा प्रश्न जेव्हां राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांच्यापुढें उभा राहिला तेव्हां लाला लजपतराय यांनीं राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांना असें सांगितलें कीं या वेळीं दोन पक्ष एकमेकांपासून अलग झाल्यास राष्ट्रीय पक्षाला सरकार दडपून टाकील आणि आपणांस कोणतेंहि कार्य करितां येणार नाहीं. लो० टिळकांनीं या सर्व परिस्थितीचा विचार करून आपलें मत असें बनविलें कीं 'यावेळीं आपल्या पक्षानें अलग होऊन स्वतंत्रपणें व एकत्र्याच्या सामर्थ्यावर सरकारशीं लढा देण्याचा प्रयत्न केल्यास तो लढा यशस्वी होण्याचा संभव नाहीं, म्हणून आपल्या पक्षानें यावेळीं नमतें घेऊन प्रागतिक पक्षाच्या प्रतिज्ञालेखावर सही द्यावी व तेथें जाऊन आपलें बहुमत करण्याचा प्रयत्न चालू ठेवावा.' हा त्यांचा सल्ला व्यवहारदक्ष मुत्सद्दी या दृष्टीनें त्या परिस्थितींत यथायोग्य होता हें खरें आहे. असें असलें तरी श्री अरविंद घोष यांची तसें करण्यास मुळींच संमति नव्हती. टिळक स्वतः सही करून गेले असते तरी अरविंदबाबू व त्यांचे ध्येयनिष्ठ तरुण अनुयायी तसें करण्यास मुळीच तयार नव्हते. अशा परिस्थितींत राष्ट्रीय पक्षाचे नेते व मुत्सद्दी या दृष्टीनें टिळकांचें कर्तव्य कोणतें होतें ? अरविंदबाबू व त्यांचे तरुण अनुयायी यांचें धोरण व्यवहारदृष्टीनें चुकीचें असलें तरी त्यांना सोडून आपण प्रागतिक पक्षाच्या परिषदेंत जाणें शहाणपणाचें झालें असतें काय ? टिळकांना तसें वाटलें नाहीं. अरविंदबाबूंचा विचार अव्यवहार्य असला तरी तो तत्त्वनिष्ठ होता. टिळकांच्या राजकीय तत्त्वज्ञानानुसार त्यांत अव्यवहार्यतेशिवाय दुसरा कोणताहि दोष नव्हता. म्हणून अशा ध्येयनिष्ठ क्रांतिकारक वृत्तीच्या तरुण नेत्यांना वगळून प्रागतिक पक्षाच्या परिषदेंत जाण्याचा मार्ग हा व्यवहारदृष्टीनेंसुद्धां अविवेकाचा होता. असें करण्यापेक्षां या ध्येयनिष्ठ क्रांतिकारक शक्तीला आपल्या पक्षांत समाविष्ट करून घेऊनच आपण आपला राजकीय लढा चालू ठेविला पाहिजे, मग त्यांत कांहीं काळ भीषण दडपशाहीच्या वरवंट्याखालीं आपण चुरडलों गेलों तरी हरकत नाहीं असा त्यांनीं निर्धार केला. याच्या उलट, लाला लजपतराय हे प्रागतिक पक्षाच्या प्रतिज्ञेवर सही करून त्यांच्या परिषदेंत हजर राहिले. लजपतराय व टिळक या दोहोंपैकीं टिळक हेच अधिक श्रेष्ठ मुत्सद्दी होते व त्यांनीं त्यावेळी जें धोरण स्वीकारिलें तेंच राष्ट्राच्या प्रगतीच्या दृष्टीनें योग्य होतें. व्यवहारदृष्टीनें विचार करतां थोडी माघार घेऊन नेमस्तांच्या प्रतिज्ञालेखावर सही करून त्यांच्या परिषदेंत राष्ट्रीय पक्षानें जाणें जरी समर्थनीय ठरलें असतें तरी भारतीय क्रांतिनिष्ठेची मूर्ति अशी जी अरविंदांची विभूति म्हणजेच बंगाली राष्ट्रीय पक्षाची शक्ति तिला बाहेर ठेवून टिळकांसारख्या राष्ट्रीय पुढाऱ्यानें प्रागतिक परिषदेंत जाणें हें केव्हांहि समर्थनीय ठरलें नसतें. राष्ट्रीय क्रांतिशक्तीची मूर्ति बाहेर फेंकून देऊन राष्ट्रीय राजकारणाचा लढा यशस्वी करण्याची आशा धरणें हें व्यवहारदक्ष राजकारण म्हणतां येणार नाहीं.

लो. टिळकांनीं आपली व्यवहारदक्षता भारतीय क्रांतीला साथ देऊन तिच्या यशस्वितेसाठीं दडपशाहीच्या अग्निकुंडांत उघड्या डोळ्यांनीं उडी टाकून जें अग्निदिव्य केलें त्यांतच प्रकट केली. या अग्निदिव्यांतून लो. टिळक पार पडल्यानंतर १९१६ सालीं बंगाली राष्ट्रीय पुढाऱ्यांना त्यांच्या व्यवहारदक्ष मुत्सद्देगिरीचें महत्त्व पटलें. लो. टिळकांनीं बिपिनचंद्र पाल व








व चित्तरंजनदास यांच्यासहित नेमस्तांच्या प्रतिज्ञापत्रावर सही करून राष्ट्रसभेंत प्रवेश केला आणि प्रवेश करितांच तिचें नेतृत्व आपल्या हातीं घेऊन तिला भारतीय स्वराज्याच्या लढ्याचें मूर्त प्रतीक बनविलें. या वेळीं अरविंदबाबूंनीं राजकारणाचा संन्यास घेतला होता. ते १९१० सालापासून पाँडिचरीस जाऊन राहिले होते. पण त्यांनाहि त्या काळांत टिळक व बेझंट यांनीं जी होमरूलची चळवळ केली किंवा म. गांधींनीं द. आफ्रिकेंत जशी निःशस्त्रप्रतिकाराची किंवा सत्याग्रहाची चळवळ केली तशी चळवळ करून भारतीय स्वराज्याचा लढा चालूं ठेवणें हेंच व्यवहारतः योग्य राजकारण आहे असें पटलें होतें. १९१० सालीं 'वंदे मातरम्' पत्राच्या खटल्यांतून बाहेर पडल्यावर व टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढारी तुरुंगांत गेले असतां जेव्हां ते राष्ट्रीय चळवळीची दिशा व्यवहारदृष्टीनें ठरविण्याचा विचार करूं लागले तेव्हां त्यांना अशाच प्रकारचे विचार सुचले होते असें अरविन्दांनीं लिहिलें आहे. पण अशा चळवळीचे नेते आपण स्वतः बनूं शकणार नाहीं असेंहि त्यांना वाटत होतें. यासंबंधीं ते लिहितात :

" Sri Aurobindo began, however, to consider how to revive the national movement under the changed circumstances. He glanced at the possibility of falling back on a Home Rule Movement which the government could not repress. But this, which was actually realised by Mrs. Besant later on, would have meant a postponement and a falling back from the ideal of independence. He looked also at the possibility of an intense and organised passive resistance movement in the manner afterwards adopted by Gandhi. He saw, however, that he himself could not be the leader of such a movement. "

-Sri Aurobindo, ibid. 63; 64

वर ज्या प्रकारच्या चळवळींचा उल्लेख अरविंदबाबूंनीं केलेला आहे तशीच चळवळ करून स्वराज्याच्या प्राप्तीचा लढा राष्ट्रसभेमार्फत करण्याचें धोरण लो० टिळकांनीं १९१६ सालीं राष्ट्रसभा हस्तगत केल्यानंतर अवलंबिलें. लखनौ-अधिवेशनांत हिंदु-मुसलमान आणि प्रागतिक व राष्ट्रीय अशा सर्वांचें ऐक्य त्यांनीं साधिलें आणि १९१७ सालीं होमरूल-लीगमार्फत डॉ० बेझंट यांच्या सहकार्यानें स्वराज्य-प्राप्तीसाठीं अखंड राष्ट्रव्यापी आंदोलन सुरूं केलें. जेव्हां सरकारनें डॉ० बेझंट यांना स्थानबद्ध केलें, तेव्हां स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य या चतुःसूत्रीचें त्यांनीं पुनरुज्जीवन केलें. इतकेंच नाहीं तर म० गांधींना नेतृत्व देऊन बेझंटप्रभृति ज्या पुढाऱ्यांना सरकारनें बंदींत ठेवलें होतें त्यांना विशिष्ट मुदतींत बंधमुक्त केलें नाहीं, तर सविनय कायदेभंगाच्या रूपानें सत्याग्रह सुरूं करावा असा ठराव ऑल इंडिया काँग्रेसकडून त्यांनीं मंजूर करून घेतला. राष्ट्रसभेंत असें नवचैतन्य निर्माण होऊन तिचें नेतृत्व राष्ट्रीय पक्षाच्या हातीं गेलें असें दिसतांच ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं १९१७ च्या ऑगस्ट महिन्यांत भारतमंत्री मि० मॉंटेग्यू यांच्या मुखानें भारताला स्वराज्य देण्याचें ध्येय मान्य करण्याची घोषणा पार्लेमेंटांत केली. लवकरच युद्धोत्तर देण्यांत येणाऱ्या स्वराज्याच्या हप्त्याची योजना मुक्रर करण्यासाठीं म्हणून भारतमंत्री हिंदुस्थानास यावयास निघाले आणि हिंदी पुढाऱ्यांशी वाटाघाटी करण्यास अनुकूल वातावरण निर्माण व्हावें म्हणून बेझंटप्रभृति हिंदी पुढाऱ्यांना स्थानबद्धतेंतून मुक्त करण्यांत आलें. अशा रीतीनें लो० टिळकांनीं सहा वर्षांच्या बंदिवासानंतर परत आल्यावर दोन-तीन वर्षांच्या आंत आपलें धोरण प्रभावी करून दाखविलें. परंतु दुर्दैवानें मॉंटेग्यूंच्या भेदनीतीला बळी पडून प्रागतिक पक्षानें १९१८ सालींच राष्ट्रसभेंतून बाहेर पडून आपला सवता सुभा पुन्हा निर्माण केला. राष्ट्रीय आघाडींत ऐनवेळीं ही जी फूट पडली तिचे परिणाम राष्ट्राला भोगावे लागले. युद्धोत्तर मिळालेल्या सुधारणा पोंचट ठरल्या तरीहि राष्ट्रसभेला लढाऊ राष्ट्रीयत्वाची दीक्षा देऊन लो० टिळकांनीं ती म. गांधींच्या हातीं दिली व १९२० सालीं " राष्ट्रसभेच्या शिस्तींत सर्वांनीं वागावें व कधीं सहकारानें तर कधीं










असहकारानें ब्रिटिश सरकारशी सतत लढून संपूर्ण स्वराज्य व स्वयंनिर्णय हे हक्क हस्तगत करा" असा संदेश राष्ट्राला देऊन त्यांनीं आपला देह ठेवला.

### सशस्त्र क्रान्तीची अनावश्यकता

१९१० च्या एप्रिल महिन्यांत श्री अरविंद घोष पॉंडिचरीस जाऊन राहिले. जोंपर्यंत ते ब्रिटिश हिंदुस्थानांत राहून राष्ट्रीय राजकारणाचें नेतृत्व करीत होते तोंपर्यंत ते बाह्यतः संपूर्ण स्वातंत्र्य आणि बहिष्कारयोगानें निःशस्त्र क्रांति या राजकारणाचा प्रचार करीत होते; तथापि जर निःशस्त्र क्रान्ति सफल झाली नाहीं अथवा सरकारी दडपशाहीमुळें लोकांना ती झेपली नाहीं तर सशस्त्र क्रान्ति करतां यावी म्हणून तिची एक गुप्तसंघटनाहि त्यांनीं आपल्या पाठीमागें उभी केली होती. पण पॉंडिचरीस जाऊन राहिल्यानंतर, "ज्या मानानें भावी घटनांचें आकलन आपणांस अधिकाधिक स्पष्टपणें होऊं लागलें त्या मानानें भारतीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठी सशस्त्र क्रान्तीची गरज नाहीं अशी आपली खात्री होऊं लागली आणि हिंदी जनतेचा प्रतिकार व आंतरराष्ट्रीय घटनांचें दडपण या दोहोंच्या प्रभावानें ब्रिटनला हिंदुस्थानला स्वातंत्र्य देणें भाग पडेल असें आपणांस दिसूं लागलें" असें ते लिहितात. यामुळें आपणांस पुन्हा हिंदी राजकारणांत नेतृत्व करण्याची गरज उरली नाहीं आणि आतां सशस्त्र क्रांतीची संघटना विसर्जन केली तरी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीला धोका नाहीं अशी त्यांची खात्री झाली व त्यांनीं अशा संघटनेशीं असलेले आपले सर्व संबंध तोडून टाकून केवळ आध्यात्मिक क्षेत्रांत त्यांनीं आपलें सर्व सामर्थ्य एकवटलें. यासंबंधीचे त्यांचे उद्गार पुढें दिले आहेत :

"As his vision of the future grew clearer, he saw that the eventual independence of India was assured by the march of forces of which he became aware, that Britain would be compelled by the pressure of Indian resistance and by the pressure of international events to concede independence and that she was already moving towards that eventuality with whatever opposition and reluctance. He felt that there would be no need of armed insurrection and that the secret preparation for it could be dropped without injury to the nationalist cause, although the revolutionary spirit had to be maintained and would be maintained intact. His own personal intervention in politics would, therefore, be no longer indispensable. Apart from all this, the magnitude of the spiritual work set before him became more and more clear to him, and he saw that the concentration of all his energies on it was necessary. Accordingly, when the Āshram came in to existence, he kept it free from all political connections or action; even when he intervened in politics twice afterwards on special occasions, this intervention was purely personal and the Āshram was not concerned in it."—

— ibid, 67; 68 —

या उताऱ्यांत म्हटल्याप्रमाणें पॉंडिचरीस जाऊन राहिल्यानंतर थोड्याच वर्षांत त्यांनीं राजकीय व्यवहाराचा पूर्ण संन्यास घेतला आणि आपलें सर्व सामर्थ्य आध्यात्मिक क्षेत्रांत एकवटलें. याचा अर्थ ते मानवसमाजाच्या ऐहिक जीवनाबद्दल उदासीन बनले असा मात्र नाहीं. कारण त्यांच्या आध्यात्मिक संपूर्ण योगाचें साध्य मानवाच्या ऐहिक जीवनालाच दैवी अवस्था प्राप्त करून देणें हें होतें. 'आजच्या मानवसमाजांत दैवी आणि आसुरी वृत्तींच्या मानवांचा जो लढा चालू आहे त्या लढ्यांत दैवी वृत्तींचा विजय व्हावा याबद्दल आपण आपल्या योगसामर्थ्यानें सतत झटत होतों मात्र आपले हे सर्व प्रयत्न अदृश्य शक्तींच्या रूपानें चालूं होते' असें ते लिहितात. तरीहि







जगांतील दैवासुरसंपत्तींमधील झगडा दैवी संपत्तीच्या पक्षानें जिंकावा ह्या हेतूनें आपण दोन वेळां जगाच्या राजकारणांत दृश्य स्वरूपांत हस्तक्षेप करून दैवी पक्षाला साहाय्य केलें असें त्यांनीं लिहिलें आहे: "(१) जेव्हां डंकर्क येथें ब्रिटिश व फ्रेंच फौजा पराभूत होऊन ब्रिटिशांना आपल्या देशांत पळून जावें लागलें तेव्हां हिट्लरचा पक्ष विजयी होऊन सर्व जगांत आसुरी संपत्तीचें राज्य होईल अशी भीति निर्माण झाली होती; त्या वेळीं ब्रिटिश व फ्रेंच यांच्या पक्षाला आपली सक्रिय सहानुभूति आहे व त्याला आपला भौतिक पाठिंबाहि आहे हें व्यक्त करण्यासाठीं आपण उघडपणें फंड उभारला व संयुक्त राष्ट्रांना साहाय्य केलें. (२) त्यानंतर जेव्हां हिंदी पुढाऱ्यांच्या-बरोबर शिष्टाई करण्यासाठी सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांना ब्रिटिश मंत्रिमंडळानें एक योजना घेऊन हिंदुस्थानांत पाठविलें तेव्हां त्या योजनेच्या आधारें ब्रिटनशीं तडजोड करावी असा निरोप आपण हिंदी पुढाऱ्यांना पाठविला. पण पुढें जेव्हां ती शिष्टाई अयशस्वी झाली तेव्हां आपण स्वस्थ बसलों व त्यानंतर केव्हांहि जागतिक राजकारणांत हस्तक्षेप केला नाहीं." क्रिप्स-शिष्टाई यशस्वी व्हावी असें वाटण्याचें कारण तसें झाल्यास ब्रिटन व भारत एक होऊन जगांतील आसुरी शक्तींचा पाडाव करतील ही आशाच होय, असें अरविन्दबाबूंनीं म्हटलें आहे. या वेळीं म. गांधींनीं जो सल्ला राष्ट्रसभेला दिला, तोच एकंदरींत व्यवहारदृष्टीनें व तत्त्वदृष्टीनें योग्य होता असेंच प्रस्तुत लेखकास वाटतें. गांधीयुगांत योगी अरविंद ह्यांनीं भारतीय राज-कारणांत फक्त याच वेळीं हस्तक्षेप केला यावरून या काळांतील भारतीय राजकारण योग्य दिशेनें चालू आहे असेंच त्यांचें मत असावें असा निष्कर्ष आपणांस काढतां येईल. एकदां सशस्त्र क्रांतीची आवश्यकता उरली नाहीं अशी खात्री झाल्यानंतर भारतीय क्रांतीला म. गांधींसारख्या अलौकिक व अद्वितीय विभूतीहून दुसऱ्या कोणत्याहि नेत्याची गरज नाहीं असें अरविंदांना वाटलें असलें तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

गांधीजींच्या अंगीं अंतःप्रेरित द्रष्टेपण आणि व्यवहारदक्ष मुत्सद्दीपण या दोनहि गुणांचा अनुपम संगम झालेला होता. अत्यंत क्रांतिकारक अशा राजकीय धोरणापासून तों अत्यंत नेमस्त अशा सनदशीर राजकारणापर्यंत सर्व प्रकारच्या राजकीय धोरणाचें नेतृत्व ते करूं शकत असत. इतकेंच नव्हे तर १९३० किंवा १९४२ यासारख्या घनघोर संग्रामाच्या राजकारणानंतर पुन्हा ते संग्राम थांबवून प्रतिपक्षाशीं शिष्टाई करण्यासहि तयार असत व त्या शिष्टाईंत प्रतिपक्षाच्या कोणत्याहि मोहास किंवा दटावणीस बळी न पडतां, झाली तर शिष्टाई यशस्वी करावी आणि शिष्टाई यशस्वी झाली नाहीं तर पुन्हां अनत्याचारी क्रांतीचा संग्राम सुरूं करावा अशा संधिविग्रहात्मक सर्व राजकारणांत ते निष्णात होते. ब्रिटिशांच्या मुत्सद्दीपणाहून श्रेष्ठ मुत्सद्दी-पण आणि क्रॉम्वेलसारख्या ब्रिटिश क्रांतिकारकांहून अधिक श्रेष्ठ, अधिक शुद्ध, आणि अधिक उन्नत असें क्रांतिकारकत्व त्यांच्यापाशीं होतें. किंबहुना असें अलौकिक क्रांतिकारकत्व त्यांनींच निर्माण केलें होतें. त्यांनीं भारताला दिलेला क्रांतिशास्त्राचा ठेवा हा केवळ राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीसच पुरणारा नसून तो भू-तलावर परमेश्वरी साम्राज्य अथवा आत्मराज्य स्थापन होऊन सत्ययुगाचा प्रारंभ होईपर्यंत कराव्या लागणाऱ्या सर्व क्रांत्यांना पुरून उरणारा असा ठेवा आहे.

### दैवी मानवांचा मुक्त समाज

योगी अरविंद घोष यांनीं भारताच्या आध्यात्मिक संस्कृतींत एक नवी प्रेरणा निर्माण केली आहे. ऐहिक मानवी जीवनाला संपूर्णपणें दैवी मानवांचा मुक्त समाज याच भू-तलावर निर्माण करणें हेंच त्यांच्या संपूर्ण समग्र योगाचें ध्येय आहे. त्यासाठीं मानवी मनांतील आसुरी वृत्तींचा समूळ उच्छेद करून मानवी मन संपूर्णतया दैवी बनविणें हें त्यांचें साध्य होतें. ज्या-प्रमाणें जड सृष्टींतून जीवसृष्टीचा विकास झाला आणि जीवसृष्टींतून दैवासुरवृत्तींनीं युक्त अशी आजची मानवसृष्टि विकास पावली, त्याचप्रमाणें आजच्या मानव-सृष्टींतून केवळ दैवी वृत्तींचें मन अथवा अतिमानस (Super-Mind) यानें युक्त असा अतिमानवांचा अथवा दैवी समाज निर्माण झाला पाहिजे असें त्यांचें तत्त्वज्ञान आहे. या अतिमानवाला अवश्य असणारी अतिमानस शक्ति आपल्या योगशास्त्रानें आपणांस अव-तरवितां येईल अशा निष्ठेनें त्यांची योगसाधना आमरण चालू होती. त्यांत यशस्वी होत असल्याचा अनुभव आपणांस आला आहे व येत आहे असें त्यांनीं लिहून








टेविलें आहे. या विषयासंबंधीं अधिक कांहींहि लिहिण्याचा अधिकार प्रस्तुत लेखकास नाहीं. या लेखांत फक्त अरविंदांच्या राजकारणाचाच विचार केलेला आहे.

## नव्या युगाचा जन्मदिन

जेव्हां १५ ऑगस्ट १९४७ रोजीं भारताला स्वातंत्र्य देण्याचा कायदा ब्रिटिश पार्लमेंटानें मंजूर केला आणि भारत व पाकिस्तान या दोन सार्वभौम स्वतंत्र राज्यांचा जन्मदिन मुक्रर झाला, तेव्हां योगी अरविंद यांना आपलीं सर्व ध्येयस्वप्नें सफल होत असल्याचें समाधान झालें. आपल्या जन्माची तारीख हीच भारतीय स्वातंत्र्याची जन्मतारीख ठरत आहे, हें पाहून त्यांना या योगायोगांत फार खोल अर्थ गर्भित असल्याचा साक्षात्कार झाला. विसाव्या शतकाच्या प्रारंभीं आपण भारतीय स्वातंत्र्याच्या लढयांत पदार्पण केलें तेव्हां आपल्या मनांत जीं स्वप्नें दृग्गोचर होत होतीं, तीं सर्व साकार करणारें नवें युग आतां पृथ्वीवर अवतरत असून या नव्या युगाचाच हा जन्मदिन आहे असें त्यांना दिसूं लागलें. त्यांचीं ध्येयस्वप्नें कांहीं साकार झालेलीं, कांहीं साकार होण्याच्या मार्गावर असलेलीं त्यांना दिसून आलीं : ( १ ) भारत हा संपूर्ण स्वतंत्र व्हावा व त्याचें एकीकरण व्हावें हें जें आपलें पहिलें स्वप्न, तें आतां सफल होत आहे. जरी आज भारत द्विखंड होत असला तरी तो लवकरच अखंड होईल व व्हावा असें त्यांना वाटत होतें. ( २ ) सर्व आशियाची युरोपच्या दास्यांतून मुक्तता होऊन त्याचें पूर्ववैभव त्याला फिरून प्राप्त व्हावें असें जें आपलें दुसरें स्वप्न, तेंहि साकार होत असल्याचें दिसत आहे. ( ३ ) सर्व जगाचें एक राज्य निर्माण व्हावें हें जें आपलें तिसरें स्वप्न त्यालाहि साकार करण्याचे प्रयत्न जग आज करीत आहे व तेंहि लवकरच सिद्धीस जाईल असें त्यांना दिसलें. ( ४ ) आपलें चौथें स्वप्न म्हणजे भारतीय संस्कृतीचा पुरातन ठेवा जें आध्यात्मिक बल अथवा आध्यात्मिक संपत्ति तिचें महत्त्व जगाला पटावें, तेंहि आतां घडूं लागलें असून सर्व जगाला त्याची जाणीव होत आहे. ( ५ ) आपलें अंतिम स्वप्न सर्व मानवसमाज दैवी बनावा हें होय असें ते म्हणतात. ही मात्र अद्यापि वैयक्तिक आकांक्षाच आहे. तथापि अत्यंत दूरदृष्टीच्या मनांना त्याचाहि प्रत्यय येत असून लवकरच त्याची जाणीव सर्व मानवांना होऊं लागेल असा विश्वास त्यांनीं प्रकट केला आहे. १५ ऑगस्ट ही अशा प्रकारें केवळ अरविंदांचीच नव्हे, केवळ स्वतंत्र भारताचीच नव्हे, तर एका नव्या जगाची व नव्या युगाची जयंती ठरणार असें योगी अरविंद यांनीं म्हटलें आहे. हे त्यांचे उद्गार यथार्थ ठरावेत असेच आपण सतत यत्न करीत राहिलें पाहिजे.

---

## आरपार — !

जुनाच झाला आहे हा जीवन-ग्रंथ !  
पोखरीत आहे वाळवी त्याला  
संथपणानें कधींची !  
असंख्य त्यांतील गंभीर अक्षरांना  
मधुनीमधुनी पडलीं भोकें !  
मोठ्या धीरानें उभा असलेला  
कोठें दिसतो खाल्लेला काना !  
ऐटींत उभी असलेली माथ्यावरची  
गिळंकृत झाली आहे तिरपी मात्रा !  
गोल वेलांटीचें डौलदार उदर  
कोठें मधेंच फाडलें आहे !  
पडक्या-झडक्या या अक्षरांतून  
कसा लावायाचा आतां अन्वय ?  
मोडक्या-तोडक्या या अक्षरांतून  
कसा काढायाचा तरी अर्थ !  
परंतु आतां —  
अक्षरांच्या बंदिस्तपणांतून  
शब्दार्थांच्या सीमा सुटून  
अक्षरांच्या नव्याच नक्षीमधून  
दिसूं लागलें आहे —  
आरपार ... आरपार !

— नरेश कवडी












प्रा. नारायण देशपांडे

# भारताचें परराष्ट्रीय धोरण

भारत व चीन या दोन प्रमुख आशियाई राष्ट्रांच्या पंतप्रधानांची दिल्ली येथें झालेली भेट ही आंतरराष्ट्रीय राजकारणांतील अत्यंत महत्त्वाची अशी घटना मानली जाते. या दोन शेजारी राष्ट्रांतील पूर्वापारचे सांस्कृतिक स्नेहसंबंध पुनरुज्जीवित करून ते वाढविले जाण्याच्या दृष्टीनें या भेटीला महत्त्व आहे; पण तें प्रसंगोपात्त येणारें महत्त्व आहे. आंतरराष्ट्रीय क्षेत्रावरील शांतताप्रस्थापनेचा महत्त्वाचा प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें जी उपाययोजना करणें आवश्यक आहे तिला चालना देणारी ( अगर देऊं शकणारी ) घटना या दृष्टीनेंच नेहरू – चाऊ एन् लाय् भेटीचें खरें महत्त्व आहे. या भेटीचें महत्त्व जरी बहुतेक सर्व निरीक्षक व पत्रप्रतिनिधी यांनीं मान्य केलें असलें तरी भेटीच्या फलश्रुतीबद्दल मात्र परस्परविरोधी अशा प्रतिक्रिया झालेल्या आढळतात. कांहीं निरीक्षकांच्या मतें नेहरू-चौ भेट हा नेहरूंच्या मुत्सद्देगिरीचा उच्चांक असून या वाटाघाटींमुळें आशियांतील शांतताप्रस्थापनेचा मार्ग सुकर झाला आहे, व त्याचा परिपाक जागतिक शांततेला पोषक असें वातावरण निर्माण करण्यांत होईल. या उलट, नेहरूंच्या धोरणाचे जे टीकाकार आहेत त्यांच्या मतें चौची भारतभेट हें त्याच्या मुत्सद्देगिरीचें फळ असून जागतिक राजकारणामध्यें लाल चीन व चौ एन् लाय् यांच्या प्रतिष्ठा वाढविण्याला नेहरू हे साधन बनले आहेत[1]. या परस्परविरोधी विचारसरणींपैकीं खरी कोणती हें काळच ठरविणार असल्यामुळें त्याबद्दल आतांच जास्त विवेचन करणें शक्य नाहीं. परंतु ही घटना भारताच्या परराष्ट्रीय धोरणाशीं सुसंगत आहे एवढेंच नव्हे तर त्या धोरणाचा तो स्वाभाविक परिपाक आहे. व त्या संदर्भांत भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें सत्य स्वरूप भारतीयांनीं अभ्यासून पहाण्याची आवश्यकता आहे.

## परराष्ट्रीय धोरणाबद्दल गैरसमज

भारत स्वतंत्र होऊन स्वतःचें परराष्ट्रीय धोरण आंखूं लागल्याला सात वर्षें होऊन गेलीं. या कालावधींत भारताच्या परराष्ट्रीय धोरणामध्यें एक प्रकारचें सातत्य कायम राहिलेलें आहे. कोणाचा गैरसमज करील अशा स्वरूपाचे कोणतेहि बदल या धोरणांत गेल्या सात वर्षांत झाले नाहींत.[2] असें असूनसुद्धां भारताच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल आजहि गैरसमज असावेत याचें आश्चर्य वाटतें. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाला या देशांत सार्वत्रिक पाठिंबा आहे हें खरें आहे. परंतु हा पाठिंबा धोरण समजून जाणतेपणानें दिलेला नसून तो बव्हंशीं विशिष्ट व्यक्तीच्या अथवा पक्षाच्या धोरणाला प्रमाण मानून दिलेला पाठिंबा आहे ही खेदाची गोष्ट आहे. या प्रवृत्तीमुळें भारताच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दलचे गैरसमज कमी होण्याऐवजीं ते वाढण्यालाच मदत होते. राष्ट्रसभाध्यक्ष या नात्यानें प्रांतिक कॅाँग्रेससमितींच्या अध्यक्षांना श्री. नेहरूंनी जें एक सविस्तर पत्रक नुकतेंच धाडलें आहे[3] त्यांत कॅाँग्रेसजनांनीं भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचा अभ्यास करावा अशी सूचना केली आहे, ती याच दृष्टीनें महत्त्वाची आहे व सर्व भारती-

१ पहा : ‘ न्यूयॉर्क टाइम्स ’, २८ जून १९५४ ( आंतरराष्ट्रीय ) अग्रलेख.

२ सप्टेंबर १९४६ च्या सुरवातीला तात्पुरत्या केंद्रीय सरकारमध्यें अधिकारस्वीकार केल्यानंतर श्री. जवाहरलाल नेहरूंनीं पत्रकारपरिषदेंत व दिल्ली नभोवाणीवरून राष्ट्राला उद्देशून केलेल्या भाषणांत भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचीं जीं सूत्रें सांगितलीं होतीं त्याच सूत्रांचा आजपर्यंत पुनरुच्चार होत आला आहे. पहा : नेहरूंची पत्रकारपरिषद् २ सप्टेंबर १९४६, आणि नेहरूः ‘ इंडिपेंडन्स अँड् आफ्टर’, पानें ३३९–३४३.

३ पहा : ‘टाइम्स ऑफ इंडिया’, जुलै ८, १९५४. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाची भूमिका समजण्याच्या दृष्टीनें हें पत्रक अत्यंत उपयुक्त ठरेल.












यांनींच अनुकरण्याजोगी आहे.

भारताच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल गैरसमज होण्याचें एक कारण असें कीं या धोरणाची पार्श्वभूमि व मुख्य उद्दिष्टें यांचा साकल्यानें विचार न करतां त्या धोरणाच्या एखाद्या विशिष्ट अंगावर अथवा स्वरूपावर लक्ष केंद्रित करून धोरणाबद्दल मत बनविण्यांत येतें. काश्मीर अथवा पाकिस्तान याबाबतच्या धोरणाचा एकांगीपणें विचार करून सबंध परराष्ट्रीय धोरणासंबंधीं मत बनविण्याची चूक या देशांत अनेक लोक करतात. त्याचप्रमाणें भारतांतल्या परकीय वसाहतींबाबत भारतसरकारनें जें धोरण स्वीकारलें आहे त्यामुळें या देशाचें परराष्ट्रीय धोरणच अस्थिर व कमकुवतपणाचें व नाकर्तेपणाचें आहे असा गैरसमज बरेचजण करून घेतात. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतल्या राजकीय रस्सीखेंचीमध्यें कोणत्याहि गटाशीं संलग्न न होण्याचें जें धोरण भारतसरकारनें स्वीकारलें आहे, त्यामुळें भारताचें परराष्ट्रीय धोरण सर्वच अनिश्चित व अधांतरीं आहे असा गैरसमज परदेशीय निरीक्षक करून घेतात. हे सर्व गैरसमज होण्याचें कारण एकच कीं भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचा साकल्यानें अभ्यास न करतां त्याच्या एखाद्या भागावरून सबंध धोरणाचें स्वरूप ठरविलें जातें व त्यामुळें साहजिकच त्या धोरणाचें ध्येय, उद्दिष्ट व तीं साधण्यासाठीं आखलेली सुसंगत कार्यपद्धति याबद्दल कांहींच कल्पना येत नाहीं.

### राष्ट्रीय जीवनाशीं सुसंगत

कोणत्याहि राष्ट्राचें परराष्ट्रीय धोरण हा त्याच्या अंतर्गत धोरणाचाच एक पूरक भाग असतो. ज्या वेळीं राष्ट्राचें अंतर्गत राजकारण, समाजव्यवस्था किंवा आर्थिक घडी यांना स्थिरता आलेली नसते किंवा राष्ट्राच्या आर्थिक व सामाजिक व्यवस्थेबद्दल निश्चित दिशा ठरलेली नसते अशा वेळीं त्या राष्ट्राचें परराष्ट्रीय धोरण हें साहजिकच अस्थिर अवस्थेमध्यें असतें. भारत स्वतंत्र झाल्यानंतरच्या पहिल्या एकदोन वर्षांमध्यें भारताच्या राजकारणांत व त्याचप्रमाणें परराष्ट्रीय धोरणांत तितकी निश्चितता आलेली नव्हती[४]. भारतसरकारच्या परराष्ट्रखात्याची पुनर्घटना होत होती. नव्यानें आंतरराष्ट्रीय राजकारणांत भाग घेणाऱ्या राष्ट्राला यंत्रणा व अधिकारिवर्ग याबाबत मोठ्या अडचणींना तोंड द्यावें लागतें. त्या अडचणींतून भारतसरकार मार्ग काढीत होतें. मुरब्बी मुत्सद्द्यांचा अभाव, चळवळीच्या राजकारणांतून पुढें आलेल्या नेतृत्वाचें मार्गदर्शन, सामान्य नागरिकांचें या विषयाबद्दल संपूर्ण अज्ञान – या व अशा इतर अडचणींमुळें परराष्ट्रीय व्यवहाराबद्दल भारत हेलकावे खात पुढें पावलें टाकीत होता. पण अशाहि परिस्थितींत भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें मुख्य उद्दिष्ट व मार्ग काय असतील याची कल्पना येऊं शकत होती. कारण ते ठरविणाऱ्या शक्ती व परंपरा भारताच्या राष्ट्रीय जीवनाशीं निगडित झालेल्या होत्या.

भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचीं विविध सूत्रें भारताच्या राष्ट्रीय जीवनांतून विकसित झालेलीं आहेत. राष्ट्रीय जीवनावर परिणाम करणाऱ्या शक्तींमध्यें देशाची भौगोलिक स्थिति, अर्थव्यवस्था, सामाजिक व वैचारिक परंपरा, राजकीय आदर्श, ऐतिहासिक घटनांमधून निर्माण झालेलीं मूल्यें वगैरेंचा समावेश होतो. यांच्या परिणामांतून बनलेल्या परराष्ट्रीय धोरणामध्यें एक प्रकारचें सातत्य आढळणें स्वाभाविक आहे. राष्ट्रीय जीवनाच्या गरजांना परराष्ट्रीय धोरण सुसंवादी असणें आवश्यक आहे. एरवीं राष्ट्रीय जीवन प्रगत तर होणार नाहींच पण स्थिरहि राहूं शकणार नाहीं. भारताचें परराष्ट्रीय धोरण या देशाच्या राष्ट्रीय जीवनांतून विकसित झालेलें असून तें त्या जीवनाशीं पूर्णपणें सुसंवादी आहे.[५] यामुळेंच परतंत्र असतांनाहि परराष्ट्रीय धोरणाचा विषय असलेल्या महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल येथल्या राष्ट्रीय चळवळीची जी भूमिका होती तीच आज स्वतंत्र भारताच्या परराष्ट्रीय धोरणामध्यें समाविष्ट झालेली आहे.

---

४ घटनासमितीमध्यें भाषण करतांना (डिसें. ४, १९४७ रोजीं ) श्री. नेहरू म्हणाले : 'Ultimately foreign policy is the outcome of economic policy, and until India has properly evolved her economic policy, her foreign policy will be rather vague, rather inchoate and will be groping.' पहाः नेहरू ' इंडिपेंडन्स अॅंड् आफ्टर ', पान २०१.

5 ..." it was a policy which flowed from our historical as well as our recent past, from our national movement and from the various ideals that we have proclaimed from time to time." –'नेहरू'ज् स्पीचेस १९४९–'५३, पान १४४.

हिंदी स्वातंत्र्याचा लढा चालू असतांना जगामध्यें इतर प्रदेशांत जे स्वातंत्र्यासाठीं लढे चालू होते त्यांबद्दल भारतीयांनीं वेळोवेळीं सहानुभूति व्यक्त केली व कांहीं प्रसंगीं सहानुभूतीची निदर्शक म्हणून आर्थिक वा वैद्यकीय मदतहि पाठविली. वसाहतवाद आणि साम्राज्यशाही या प्रतिगामी शक्ती असून त्यांचें जगांतून उच्चाटन होणें आवश्यक आहे अशी भारतीयांची भूमिका होती. किंबहुना, ब्रिटिश साम्राज्यशाहीविरोधी लढा हा जगांतल्या सर्व साम्राज्यशाहीविरोधी लढ्याचाच एक भाग आहे व म्हणून तो जगाच्या प्रगतीला पोषक आहे अशी आपल्या स्वातंत्र्यचळवळीची पीठिका होती. साम्राज्यशाही ही हुकुमशाहीला पोषक असल्यामुळें हुकुमशाहीचा नायनाट करायचा असेल, तर साम्राज्यशाही नष्ट करायला पाहिजे असा दावा मांडून महायुद्धाच्या वेळीं भारतीय स्वातंत्र्यवाद्यांनीं साम्राज्यशाहीच्या प्रतिनिधींना आत्मार्पणाचें आवाहन केलें. जगामध्यें पसरलेली आर्थिक विषमता व सामाजिक अन्याय यांचें उच्चाटन करून समतेच्या पायावर उभारलेली नवी समाजरचना निर्माण करण्याची आवश्यकता भारतीयांनीं पारतंत्र्यावस्थेंत असतांनाहि पुरस्कारिलेली आहे. वर्णविद्वेषाच्या धोरणाला तीव्र स्वरूपांत विरोध करण्याचें कार्य या देशानें गेलें अर्धशतक या ना त्या स्वरूपांत चालू ठेवलेलें आहे. आणि साध्य व साधन यांच्या परस्परसंबंधाबाबत विवेक करून साध्याशीं सुसंगत अशा साधनांचाच अवलंब भारतीयांनीं केला आहे. स्वातंत्र्यसंपादनापूर्वी भारतीयांच्या भूमिकेचीं निदर्शक अशीं जीं धोरणें वेळोवेळीं व्यक्त होत गेलीं[६] तींच आजच्या स्वतंत्र भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचीं मुख्य सूत्रें बनलीं आहेत. या दृष्टीनें भारताचें परराष्ट्रीय धोरण भारतीयांच्याच अनुभवांतून विकसित झालेलें आहे.

### नेहरू हे प्रवक्ते

भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें ध्येय जागतिक शांतता हें असून त्याला पोषक अशी परिस्थिति निर्माण करण्यावर या देशाचा भर आहे. या देशामध्यें कांहीं लोकांचा असा समज आहे कीं श्री. जवाहरलाल नेहरूंच्या विश्वबंधुत्ववादी कल्पनांच्या प्रभावामुळें जागतिक शांतता हें आपल्या परराष्ट्रीय धोरणाचें मुख्य उद्दिष्ट बनलें आहे. भारताचें परराष्ट्रीय धोरण म्हणजे नेहरूंचीं वैयक्तिक मतें – हें समीकरण पुष्कळ वेळां अनेक लोक गृहीत धरून चालतात व त्यामुळें परराष्ट्रीय धोरणाच्या कर्तृत्वाची सर्व जबाबदारी नेहरू या व्यक्तीवर टाकण्यांत येते. भारताच्या परराष्ट्रखात्याचें नेतृत्व नेहरूंकडे आहे हें खरेंच. या देशाच्या परराष्ट्रीय धोरणावर नेहरूंच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाची फार मोठी छाप पडली आहे हेंहि नाकारून चालणार नाहीं. पण याचा अर्थ या देशाचें परराष्ट्रीय धोरण नेहरूंच्या वैयक्तिक कल्पनेप्रमाणें ठरते असा करणें चूक होईल. वर निर्देशिल्याप्रमाणें या देशाच्या राष्ट्रीय जीवनांतूनच आपलें परराष्ट्रीय धोरण विकसित झालेलें आहे. नेहरूंना या राष्ट्रीय जीवनाची नाडी बरोबर ओळखतां आल्यामुळें, ते या परराष्ट्रीय धोरणाचें आत्मीयतेनें व अत्यंत प्रभावी रीतीनें विवरण करूं शकतात. भारतीय संस्कृति व भारताचे आधुनिक राष्ट्रीय जीवन यांचीं वैशिष्ट्यें जवाहरलाल नेहरूंनीं आत्मसात् केलेलीं असल्यामुळें, नेहरू हे भारतीय विचारसरणीचें प्रतीक बनले आहेत. नेहरू हे भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचे अत्यंत श्रेष्ठ असे प्रवक्ते आहेत, निर्माते नव्हेत – ही गोष्ट महत्त्वाची आहे. अर्थातच जागतिक शांतता हें नेहरूंच्या विश्वबंधुत्वाच्या कल्पनेमुळें भारतीय धोरणाचें ध्येय बनलेलें नाहीं.

### जागतिक शांतता या उद्दिष्टाचें वैशिष्ट्य

राष्ट्रीय हितसंबंध संरक्षिण्यासाठीं व राष्ट्रीय जीवनाच्या विकासासाठींच राष्ट्रीय धोरणाची आंखणी होत असते. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाची आंखणी भारताच्या राष्ट्रीय हितसंबंधावरच आधारलेली आहे. आपल्या संकुचित राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनेंसुद्धां भारताला जागतिक शांतता ही आजच्या घडीला अत्यंत आवश्यक गोष्ट आहे. राजकीय दृष्ट्या भारतानें नवी लोकसत्तात्मक गणराज्याची घटना स्वीकारून जो लोकशाहीचा महान् प्रयोग यशस्वी करावयाचें ठरविलें आहे. त्याला आवश्यक ती उसंत मिळण्यासाठीं जगामध्यें शांतता राहणें आवश्यक आहे. लोकशाहीचे

---

६ आंतरराष्ट्रीय प्रश्नावर वेळोवेळीं राष्ट्रसभेनें जे ठराव केले त्यांमधून हीं धोरणें व्यक्त झालीं आहेत. पहा : ए. आय्. सी. सी. : ' दि बॅकग्राऊंड ऑफ् इंडियाज् फॉरिन् पॉलिसी. ' १९५२










संकेत व निर्बंध हे युद्धपरिस्थितीला प्रथम बळी पडतात. ज्या देशांत लोकशाहीचीं बीजें खोलवर रुजलेलीं नसतील व भारताला अद्याप लोकशाहीची पुरेशी तोंडओळखहि झालेली नाहीं—अशा देशांत युद्धपरिस्थिति निर्माण झाल्यास लोकशाही संपुष्टांत येईल. व पुनः लोकशाहीचा प्रादुर्भाव तेथें केव्हां होईल हें सांगणें कठीण आहे. युद्धपरिस्थिति निर्माण झाल्यास भारतांतील लोकशाहीचें भवितव्य असेंच भीषण होणार आहे. आर्थिक दृष्टया भारतानें नियोजनात्मक आर्थिक विकासाचा कार्यक्रम पत्करला असून पंचवार्षिक योजनेच्या टप्प्याटप्प्यानें या देशांतील नागरिकांचे आर्थिक जीवन सुधारण्याचें ठरविलें आहे. जागतिक शांतता धोक्यांत येऊन त्यामुळें निर्माण होणाऱ्या परिस्थितीला तोंड देण्याची भारतावर पाळी आली तर आर्थिक विकासाच्या या सर्व योजना गुंडाळून भारताला आपलें सामर्थ्य युद्धपरिस्थितीला तोंड देण्याच्या कामीं गुंतवावें लागेल. त्यामुळें या देशांतील नागरिकांचें आर्थिक जीवन अप्रगत अवस्थेमध्येंच राहील. सामाजिक दृष्टयाहि भारताला शांततेची आवश्यकता आहे. युद्धपरिस्थितीमुळें सामाजिक घडी विस्कळीत होते. भारतीय समाजाची नव्या पायावर पुनर्घटना करण्याचें महत्कार्य या राष्ट्रापुढें आहे. तें युद्धपरिस्थितीमुळें सफल होण्याऐवजीं जास्तच बिकट होईल. याप्रमाणें या राष्ट्राच्या राजकीय, आर्थिक व सामाजिक जीवनांतील आदर्श व आकांक्षा जागतिक शांतता न टिकल्यास संपुष्टांत येतील व प्रगतीच्या दिशेनें नुकतीच सुरू केलेली वाटचाल खुंटून भारतीय समाज पुनः बराच मागें जाण्याची भीति आहे. जी परिस्थिति भारताची तीच थोड्याबहुत फरकानें नव्यानें स्वतंत्र झालेल्या इतर आशियाई राष्ट्रांची असल्यामुळें जागतिक शांतता टिकविण्यामध्यें भारताप्रमाणेंच इतरहि आशियाई राष्ट्रांचे हितसंबंध गुंतले आहेत. आतां जागतिक शांतता कायमची टिकेल असें कोणीहि सांगूं शकणार नाहीं. परंतु सद्यःपरिस्थितीमध्यें जेवढा शांततेचा उसंत मिळेल तेवढा या नव्या राष्ट्रांना आवश्यक आहे. आणि शिवाय शांतता जेवढी दीर्घकाल टिकेल तेवढी भावी कालांत युद्धाची शक्यता आणखीच कमी होणार आहे. या दृष्टीनें दीर्घकालीन शांतता प्रस्थापिण्याचें एक साधन म्हणूनहि तात्कालिक शांतता जास्तींत जास्त वेळ टिकविण्याचे प्रयत्न केले पाहिजेत.

आतां वरील विचारसरणीमध्यें असें गृहीत धरलें आहे कीं जागतिक युद्ध सुरूं झाल्यास भारताला या युद्धपरिस्थितीचे परिणाम टाळतां येणार नाहींत. तिसरें महायुद्ध सुरू झालें तर त्याची झळ भारताला लागणें अपरिहार्य आहे. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें उद्दिष्ट तिसऱ्या महायुद्धामध्यें भारताची तटस्थता टिकविणें हें आहे असें कित्येक वेळां सांगण्यांत येतें. परंतु ही विचारसरणी सदोष आहे. तिसरें महायुद्ध ज्या परिस्थितीमध्यें सुरू होईल त्यावर भारताची त्याबद्दलची प्रतिक्रिया अवलंबून राहील हें खरें. परंतु तशा युद्धपरिस्थितीमध्यें आपण पूर्णपणें अलिप्त राहूं शकूं अशी आपण समजूत करून घेतां उपयोगी नाहीं.[७] स्वतःच्या लष्करी सामर्थ्यानें भारत तटस्थता टिकवूं शकणार नाहीं, हें उघडच आहे. आणि भारताची भौगोलिक स्थिति, साधनसंपत्ति, मनुष्यबळ व आंतरराष्ट्रीय राजकारणांतील स्थान या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे भावी महायुद्धांतले जे संभाव्य प्रतिस्पर्धी – रशिया व अमेरिका यांचे गट – ते भारताच्या तटस्थतेचें संरक्षण करतील अशी आशा बाळगणेंहि चूक ठरेल. तेव्हां तिसरें महायुद्ध सुरूं झालें तर त्याची झळ भारताला लागणार हें स्पष्ट असल्यामुळेंच तें होण्याचें टळलें तरच भारताचे राष्ट्रीय हितसंबंध सुरक्षित रहाणार आहेत. जागतिक शांतता हें भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें उद्दिष्ट बनलें तें यासाठींच. ही शांतता भंग पावली तर भारताचें धोरण त्या प्रमाणांत विफल झालें असें मानणें प्राप्त आहे. आणि म्हणूनच जागतिक शांततेला निर्माण होत असलेले धोके शक्य तितके कमी करण्याचा भारताचा अट्टाहास आहे.

जागतिक शांतता टिकविण्यासाठीं जी उपाययोजना करावयाची त्यासंबंधांत भारतीय विचारसरणी व पाश्चात्य ( विशेषतः अमेरिकेच्या चालू राज्यकर्त्यांची )

७ या संबंधांत नेहरूंचे खालील उद्गार विचारार्ह आहेत : "It is a little difficult now-a-days in world-wars to be neutral. Any person with any knowledge of international affairs knows that." – " नेहरू : इंडिपेंडन्स ॲंड् आफ्टर " पृ. २००.








विचारसरणी यांमध्यें महत्त्वाचा फरक आढळतो. अमेरिकेंतील राज्यकर्त्यांच्या मतें, साम्यवादी गटाचें साम्राज्यशाही धोरण हाच एक जागतिक शांततेला धोका असून त्या गटाला पायबंद घातल्याशिवाय जगांत शांतता नांदणार नाहीं; आणि रशियन साम्राज्यवादाला पायबंद घालण्याचा एकच मार्ग म्हणजे इतर ' स्वतंत्र ' राष्ट्रांनीं संघटित होऊन लष्करी सामर्थ्य वाढवावयाचें हा होय. यासाठींच अमेरिकेनें उत्तर ॲटलॅंटिक संघटना, ॲंझस करार, अमेरिकन राष्ट्रांची संघटना इत्यादि संघटना निर्माण केल्या असून मध्यपूर्व, आग्नेय आशिया, अतिपूर्व या प्रदेशांतून तशासारख्याच संघटना बनविण्याचा खटाटोप चालविला आहे. भारतीय विचारसरणी अगदीं भिन्न आहे. साम्यवाद हें राष्ट्रीय तत्त्वज्ञान म्हणून भारतानें स्वीकारलेलें नाहीं एवढेंच नव्हे तर भारतांतील साम्यवादी पक्षाच्या कार्यावर भारतसरकारनें वेळोवेळीं अनेक नियंत्रणेंहि लादलीं आहेत. परंतु त्याचबरोबर साम्यवादी तत्त्वज्ञानाचा स्वीकार हाच जागतिक शांततेचा धोका हें समीकरणहि भारतानें मान्य केलेलें नाहीं. जागतिक शांततेच्या प्रश्नाचा भारतीय परंपरेला साजेशा मौलिक पद्धतीनें विचार करून भारताचें धोरण ठरविलें गेलें आहे. आणि अमेरिकेच्या भूमिकेपेक्षां अगदीं वेगळी अशी भूमिका भारतानें पुरस्कारली आहे.

## सुसंगत उपाययोजना

जागतिक शांतता टिकवावयाची असेल तर ज्या कारणांमुळें ही शांतता धोक्यांत येण्याचा संभव असतो तीं कारणें मुळांतच नष्ट करायला पाहिजेत. सामाजिक असंतोष हा शांततेला मुख्य धोका असतो. या असंतोषाचीं तीन मुख्य व मौलिक कारणें आहेत : ( १ ) साम्राज्यवाद ( २ ) वर्णविद्वेष ( ३ ) आर्थिक व सामाजिक विषमता. साम्राज्यवाद हा जागतिक शांततेला मोठा धोका असल्यामुळें साम्राज्यवादाचें उच्चाटन करणें आवश्यक आहे अशी भारताची भूमिका आहे. ही भूमिका भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीच्या वेळींच भारतीय नेत्यांनीं पुरस्कारली होती. भारत स्वतंत्र झाल्यापासून, संयुक्तराष्ट्रांमध्यें अथवा इतरत्र साम्राज्यवाद अथवा वसाहतवाद यांचें उच्चाटन करण्याच्या वेगवेगळया उपाययोजनांचा भारतानें पुरस्कार केला आहे. निरनिराळया राष्ट्रांच्या स्वयंनिर्णयाच्या हक्कास मान्यता मिळावी यासाठीं भारतीय प्रतिनिधींनीं आग्रह धरलेला आहे. इंडोनेशियाच्या प्रश्नाबाबत फ्रेंच वसाहतींतील राष्ट्रीय चळवळीबाबत अथवा इजिप्तप्रभृति मध्यपूर्वेतील राष्ट्रांच्या राष्ट्रीय मागण्यांबाबत आंतरराष्ट्रीय क्षेत्रामध्यें भारतानें जी भूमिका पुरस्कारिली ती साम्राज्यवादाला विरोध करणारी व जागतिक शांततेला पोषक अशीच होती. संयुक्तराष्ट्राच्या विश्वस्तमंडळानें आतांपर्यंत जें कार्य केलें आहे, त्यामध्यें अ-स्वयंशासित प्रदेशांची स्वातंत्र्याप्रत जलद प्रगति व्हावी या दृष्टीनें भारतानें प्रयत्न केले आहेत.

वर्णविद्वेषाचा प्रश्न हा साम्राज्यवादाच्या प्रश्नाशीं निगडितच आहे. वर्णविद्वेष हा सांस्कृतिक साम्राज्यवादच होय. वर्णविद्वेषाच्या प्रश्नाला संयुक्तराष्ट्रामध्यें तोंड फोडून त्यासंबंधीं जागतिक मत जागृत करण्याचें काम भारतानें केलें आहे. दक्षिण आफ्रिकेच्या वर्णविद्वेषी धोरणाचा संयुक्तराष्ट्रानें निषेध केलेला आहे. त्याचप्रमाणें जगांतल्या निरनिराळया प्रदेशांत दारिद्र्य व विषमता यांमुळें जो असंतोष पसरलेला आहे, तो कमी करण्याच्या दृष्टीनें आर्थिक समता व सामाजिक न्याय यांचा आंतरराष्ट्रीय संघटनांमार्फत प्रसार करण्यांत भारताचा पुढाकार आहे. संयुक्तराष्ट्राचें व इतर आंतरराष्ट्रीय संघटनांचें आर्थिक व सामाजिक क्षेत्रामध्यें जें मोठें महत्त्वाचें कार्य चालू आहे त्यामध्यें भारतानें प्रथमपासून आत्मीयतेनें व हिरीरीनें भाग घेतला आहे. आर्थिक दृष्ट्या अप्रगत असलेल्या देशांना प्रगत राष्ट्रांच्या दिशेनें पुढें जातां यावें म्हणून परस्परसहकार्यावर आधारलेल्या निरनिराळया उपाययोजनांचा भारत पुरस्कार करीत आहे. तंत्रविषयक साहाय्याचा कार्यक्रम ( Technical Assistance Programme) हा या दृष्टीनें अतिशय उपयुक्त आहे अशी भारताची भूमिका आहे. याप्रमाणें साम्राज्यशाही व वसाहतवाद आणि वर्णविद्वेष यांचें उच्चाटन करून आर्थिक समता व सामाजिक न्याय यांवर आधारलेली जगाची उभारणी केली तरच जागतिक शांतता नांदू शकेल अशी भारताची विचारसरणी असून त्याला सुसंगत अशा उपाययोजनांचा स्वतंत्र भारत पुरस्कार करीत आहे.

चिरस्थायी स्वरूपामध्यें जागतिक शांतता प्रस्थापित करण्यासाठीं काय केलें पाहिजे याबद्दलच्या भारताच्या भूमिकेचें वर विवेचन केलें आहे. परंतु ही दीर्घकालीन








उपाययोजना चालू असतांना शांततेला जे तात्कालिक धोके निर्माण होतात त्यासंबंधींच्या भारताच्या भूमिकेचाहि निर्देश करायला पाहिजे. पुष्कळ वेळां खबरदारी घेऊनहि मर्यादित स्वरूपांत युद्धपरिस्थिति निर्माण होते. दुसरें जागतिक महायुद्ध संपल्यानंतरच्या गेल्या नऊ वर्षांत इराण, ग्रीस, पॅलेस्टाइन, इंडोनेशिया, काश्मीर, कोरिया व इंडोचायना इत्यादि क्षेत्रांमध्यें असे प्रसंग निर्माण झाले. या बाबतची भूमिका ठरवितांना जागतिक शांततेचें अंतिम ध्येय डोळ्यापुढें ठेऊन त्याला धोका पोहोंचणार नाहीं यासाठीं लढ्याचें क्षेत्र मर्यादित ठेवावयाचें व शक्य तों शांततेच्या मार्गांनीं मतभेदाचे प्रश्न सोडवावयाचे असें धोरण भारतानें पुरस्कारिलें आहे. मात्र शांततेसाठीं नैतिक मूल्यें भारतानें सोडलीं नाहींत. काश्मीर व कोरिया हीं दोनच उदाहरणें विचारांत घेतलीं तर भारताची भूमिका बरोबर समजूं शकेल.

## काश्मीर

काश्मीरच्या प्रश्नाबाबत युद्धबंदी मान्य करून संयुक्त राष्ट्राच्या मध्यस्थीला भारतानें पूर्ण वाव दिला. किंबहुना लढ्याचें क्षेत्र विस्तृत करून लष्करी सामर्थ्याच्या जोरावर भारताला काश्मीरचा प्रश्न स्वतःच्या कल्पनेप्रमाणें सोडविण्याची शक्यता असतांना — आणि तो तसा सोडवावा असें या देशांत कांहीं लोकांचें मत असतांना — नेहरूंनीं आपणहून हा प्रश्न संयुक्तराष्ट्रांपुढें नेला. गेल्या सात वर्षांत या प्रश्नाबद्दल संयुक्तराष्ट्रामध्यें कांहीं प्रगति झाली नाहीं. हा प्रश्न संयुक्तराष्ट्रांपुढें नेण्यांत चूक झाली व तो आतां तेथून काढून घ्यावा अशी आजहि या देशांत मागणी होत असतांना भारतानें संयुक्तराष्ट्रापुढून हा प्रश्न काढला नाहीं. आंतरराष्ट्रीय क्षेत्रामध्यें या प्रश्नाबाबत भारतानें जीं आश्वासनें दिलीं आहेत तीं पार पाडण्याचा निर्धार नेहरू पुनः पुनः व्यक्त करतात. याच्यामागें हा प्रश्न शांततेनें सुटावा हीच भूमिका आहे. काश्मीरच्या प्रश्नामध्यें भारताच्या दृष्टीनें जीं नैतिक मूल्यें गुंतलेलीं आहेत (उदा. निधर्मी राज्याची कल्पना) त्यांपासून न ढळतां शांततेच्या मार्गाचा अवलंब करावयाचा हें भारताचें धोरण आहे. कांहीं लोकांना हें धोरण पडखाऊपणाचें वाटतें. परंतु भारताच्या परराष्ट्रीय धोरणाशीं सुसंगत असेंच हें धोरण आहे. भारतांतील परकीय वसाहतींबाबत भारतानें जें शांततेचें धोरण ठेवलें आहे तेंहि कमकुवतपणाचें निदर्शक मानण्याचें कारण नाहीं ! कोणत्याहि उपाययोजनेचे संभाव्य परिणाम लक्षांत घेऊन जी उपाययोजना जागतिक शांततेला धोका देणार नाहीं अशी उपाययोजना पुरस्कारण्याचें भारताचें धोरण आहे.

## कोरिया

कोरियामध्यें जून १९५० मध्यें युद्ध सुरू झालें तेव्हां उत्तर कोरियाचें आक्रमण व तें आक्रमण थांबविण्याची आवश्यकता या मुद्द्यांवर भारतानें संयुक्तराष्ट्राच्या बहुसंख्य सभासदांबरोबर मत दिलें. परंतु संयुक्तराष्ट्रांचें सैन्य ३८ व्या अक्षांशापलीकडे जाऊन जेव्हां सर्व उत्तर कोरिया व्यापण्याचे बेत करूं लागलें तेव्हां ही परिस्थिति शांततेला पोषक ठरण्याऐवजीं विघातक ठरेल व त्यामुळें युद्धक्षेत्र विस्तृत होईल अशी भीति वाटल्यामुळें भारतसरकारनें अमेरिकेच्या धोरणाला विरोध केला. कोरियामध्यें पुढें ज्या घटना घडल्या त्या लक्षांत घेतल्या म्हणजे भारताच्या भूमिकेचें महत्त्व सहज लक्षांत येतें. कोरियाच्या एकीकरणाचा राजकीय प्रश्न सोडविण्यासाठीं कोरियामध्यें युद्धबंदी होणें आवश्यक होतें. आणि म्हणूनच कोरियांतील शस्त्रसंधीच्या प्रश्नामध्यें भारतानें पुढाकार घेतला. युद्धकैद्यांच्या अदलाबदलीचें कार्य पार पाडण्यामध्यें भारतानें सक्रिय जबाबदारी स्वीकारली. कारण हें कार्य यशस्वी रीत्या पार पाडण्यावर शस्त्रसंधीचें भवितव्य अवलंबून होतें. इंडोचायनामध्यें शस्त्रसंधि झाला तर इतर प्रश्नांबद्दल वाटाघाटी करणें शक्य होईल व त्या प्रदेशांमधून जागतिक शांततेला धोका येण्याचा जो संभव आहे तो कमी होईल या दृष्टीनेंच इंडोचायनामध्यें युद्धविराम व्हावा यासाठीं भारताचे प्रयत्न चालू आहेत.

युद्धबंदीच्या प्रश्नाबद्दल काश्मीर, कोरिया अथवा इंडोचायना इत्यादि क्षेत्रांमध्यें भारतानें आग्रहाची भूमिका स्वीकारली याचें कारण मागें सांगितल्याप्रमाणें साध्य व साधन याबाबतचा विवेक हेंहि एक आहे. मतभेद मिटविण्यासाठीं शक्य तो शांततेच्या मार्गाचा अवलंब करावयाचा हें भारताचें धोरण आहे. शांततामय मार्गावरील विश्वास हा भारताच्या प्राचीन परंपरेमधून चालत आलेला आहे. भारतीयांच्या सर्वसामान्य व्यवहारामध्येंहि या परंपरेचा प्रभाव दिसतो. जें साध्य असेल त्याच्याशीं साधन सुसंगत असल्याशिवाय साध्य गांठतां येणार नाहीं. शांतता प्रस्थापित करावयाची

असेल तर युद्धाची तयारी करून चालणार नाहीं. युद्ध-परिस्थिति कुठें निर्माण होत असली तर ती काबूंत ठेवून तिचें क्षेत्र मर्यादित करावयाचें व तडजोड, मध्यस्थी, वाटाघाटी इत्यादि शांततेच्या मार्गांनीं तंट्या-चा निकाल लावावयाचा प्रयत्न करायचा हाच रास्त मार्ग आहे. आणि म्हणून युद्धबंदी करण्यावर प्रत्येक वेळीं भारत भर देत आला आहे. याशिवाय युद्धाच्या मार्गानें जें राजकीय उद्दिष्ट साधावयाचें असेल तेंहि साधण्याची खात्री नसते. कोरियांतील युद्धामुळें कोरिया-चें राजकीय एकीकरण व पुनर्घटना हे हेतू सिद्ध होण्याचे दूरच राहिले; तेथील परिस्थिति पूर्वीपेक्षांहि बिकट झाली आहे. तिसरें महायुद्ध झालें तर त्यामुळें युध्यमान राष्ट्रांचे हेतू सफल होण्याची शक्यता आतां राहिली नाहीं. कारण आतां सुरू असलेल्या अणुयुगामध्यें युद्धाचें स्वरूपच इतकें पालटत चाललें आहे कीं भावी महायुद्धामध्यें कोणी 'विजेता' ठरण्याऐवजीं सर्वनाश होण्याची शक्यताच जास्त. अशा परिस्थितींत युद्धानें काय साधणार ?

## 'तिसरा गट' नव्हे, 'तिसरा प्रदेश'

आंतरराष्ट्रीय क्षेत्रामध्यें सध्यां ज्या दोन प्रबळ सत्तागटांमध्यें रस्सीखेंच चालू आहे त्या सत्तागटांपासून अलिप्त रहाण्याचें धोरण भारतानें स्वीकारलें आहे याचें कारण ही सत्तागट बनविण्याची प्रवृत्ति शांततेला विघातक ठरणारी आहे म्हणून. रशिया व अमेरिका यांच्या नेतृत्वाखालील गटांनीं सर्व जगाची जर पुरी विभागणी केली तर आंतरराष्ट्रीय संबंधांतील कोणताहि मतभेदाचा प्रश्न सोडविण्यास युद्धाखेरीज दुसरा मार्ग रहाणार नाहीं. या दोन गटांमध्यें वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठीं लष्करी सामर्थ्य वाढविण्याची चुरस चालू राहील व त्यामधून महायुद्ध उद्भवणें अपरिहार्य होईल. सत्तागटांचे बनाव घट्ट होत गेले तर आंतरराष्ट्रीय व्यवहारांत खुलेपणा राहूं शकणार नाहीं व साहजिकच तडजोड अथवा वाटाघाटी यांना अवसर रहाणार नाहीं. 'थंड्या लढाई'मध्यें विजय मिळविण्याच्या दृष्टीनें प्रत्येक प्रश्नाबद्दल आगाऊच मतें ठरविण्यांत येतील व ज्या वेळीं प्रत्येक प्रश्नावर परस्परविरोधी अशीं दोन मतें सतत व्यक्त होत रहातील त्यावेळी लढाईचा 'थंडेपणा' संपून जाईल. शिवाय यामुळें दोन्ही सत्तागटांमध्यें परस्परासंबंधीं भीति वाढत जाईल आणि या भीतीचा लोकांच्या मनावर पगडा बसला म्हणजे त्यांना योग्य — अयोग्य, चूक-बरोबर इत्यादींचा विवेक रहात नाहीं. यांमधून सर्वनाश होण्याचा धोका उद्भवतो. सध्यांचा सत्तागटांचा बनाव हा आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील सत्तेच्या राजकारणाचा परिपाक आहे. यामुळें जागतिक शांततेला पोषक परिस्थिति निर्माण होण्याऐवजीं शांतता धोक्यांत येणार आहे. म्हणून या सत्तागटांच्या बनावाला भारताचा विरोध आहे.

रशिया व अमेरिका यांच्या वर्चस्वाखालीं न गेलेल्या राष्ट्रांचा तिसरा गट बनवावा अशी विचारसरणी कांहीं लोक पुढें मांडतात.[८] तिसरा गट बनला तर आंतर-राष्ट्रीय व्यवहारामध्यें थोडा जास्त खुलेपणा येईल हें खरें. परंतु सत्तागटांच्या राजकारणाला विरोध करण्याचा तो मार्ग नव्हे. रशिया काय किंवा अमेरिका काय, दोन्ही गटांची प्रवृत्ति एकच — सत्तेच्या राजकारणामध्यें स्वतःचा प्रभावी गट बनवायचा. या प्रवृत्तीला विरोध करण्याची भूमिका भारताची आहे आणि हा विरोध करण्याचा एकच मार्ग भारताला उपलब्ध आहे तो म्हणजे या प्रवृत्तीला विरोधक अशा विचारसरणीचा प्रसार करावयाचा. उत्तर ॲटलांटिक करार संघटना किंवा योजिलेल्या आग्नेय आशियाई संघटना इत्यादि संघटनांच्या बनावाला भारताचा विरोध आहे तो या संघटना सत्तेच्या राजकारणाच्या प्रातिनिधिक संघटना आहेत म्हणून. पाकिस्तानबरोबर अमेरिकेनें केलेल्या लष्करी कराराबद्दल भारतानें विशेष तीव्र स्वरूपांत विरोध व्यक्त केला. कारण या करारामुळें सत्तागटाचा बनाव भारताच्या सरहद्दीला येऊन भिडला व बऱ्याच मोठ्या प्रदेशांत युद्धपरिस्थितीला पोषक असें वातावरण पसरलें म्हणून. पण पाकिस्ताननें अमेरिके-बरोबर लष्करी करार केला म्हणून भारतानें रशियाच्या गटाबरोबर करार करावा ही भूमिका भारताच्या पर-राष्ट्रीय धोरणाशीं पूर्णपणें विसंगत आहे. जेवढा जास्त प्रदेश या सत्तागटांच्या बनावापासून अलिप्त ठेवतां येईल तेवढें तें युद्धपरिस्थिति टाळायला सहायक ठरेल. या दृष्टीनें श्री. नेहरूंनीं लोकसभेमध्यें एकदां

८ उदा० भारतीय प्रजासमाजवादी पक्षानें ही कल्पना पुरस्कारली आहे. पहा: बेतूल येथील खास अधिवेशनाचा अहवाल, १९५३.








'तिसरा प्रदेश' ( Third Area ) असा शब्द-प्रयोग केला होता तो सूचक होता.[९] असा हा 'तिसरा प्रदेश' म्हणजे तिसरा गट नसून सत्तागटांच्या बनावा-पासून अलिप्त असा प्रदेश होय.

## 'तटस्थ' म्हणणें बरोबर नाहीं

सत्तागटापासून अलिप्त रहाण्याच्या भारताच्या धोरणाबद्दल पुष्कळच गैरसमज पसरलेले आहेत आणि या धोरणाचे 'तटस्थतेचें धोरण' असें वर्णन केल्यामुळें हे गैरसमज वाढायलाच मदत झाली आहे. भारताच्या धोरणासंबंधांत 'तटस्थता' या शब्दाचा उपयोग करणेंच चूक आहे. आंतरराष्ट्रीय क्षेत्रामध्यें ज्या अनेक प्रश्नांवर निर्णय घ्यावा लागतो त्या प्रश्नांबद्दल स्वतःचें कांहींच मत नसेल व या मतभेदांमध्यें निष्कारण पडायला नको म्हणून एखादें राष्ट्र प्रत्येक प्रश्नावर मतप्रदर्शन करण्यापासून अलिप्त रहात असेल तर त्या राष्ट्राचें धोरण तटस्थतेचें आहे असें म्हणतां येईल. आणि सध्यांच्या जागतिक राज-कारणाच्या परिस्थितींत 'तटस्थता' टिकवावयाची असेल तर आंतरराष्ट्रीय राजकारणापासूनच अलिप्त रहाणें आवश्यक ठरते. आंतरराष्ट्रीय संघटनांचें सभा-सदत्व पत्करल्यानंतर निरनिराळया प्रश्नांवर कोणती ना कोणती बाजू घ्यावी लागतेच. म्हणून स्वित्झर्लंडसारखें राष्ट्र आपली तटस्थतेची भूमिका टिकविण्यासाठीं आंतरराष्ट्रीय संघटनांपासून अलिप्त रहात असते. भारतानें प्रथमपासूनच सर्व आंतरराष्ट्रीय संघटनांच्या कार्यामध्यें उत्साहानें भाग घेतला आहे. बहुतेक सर्व महत्त्वाच्या प्रश्नांवर स्वतःच्या भूमिकेस सुसंगत असें मतप्रदर्शन केलें आहे व हें मतप्रदर्शन करतांना प्रश्नाच्या गुणावगुणांचा विचार करून मत ठरविलें आहे. रशिया अथवा अमेरिका यांच्या मतांचा विचार करून भारतानें मतप्रदर्शन केलें नाहीं ही मुख्य गोष्ट आहे. त्यामुळें आंतरराष्ट्रीय प्रश्नावर भारतानें तटस्थते-ची भूमिका घेतली आहे असें म्हणणें चूक आहे. तटस्थतेला 'भावात्मक' किंवा 'विधायक' अशीं निरनिराळीं विशेषणें लावूनसुद्धां तटस्थता हें भारता-च्या धोरणाचें वर्णन बरोबर ठरत नाहीं. महायुद्ध सुरू झालें तर त्याप्रसंगीं आपली 'तटस्थता' टिकवावी हा भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचा हेतु आहे हें म्हणणें सुद्धां बरोबर नाहीं, याचें वर विवेचन केलेंच आहे. त्यामुळें भारताच्या धोरणाचें विवेचन करतांना 'तटस्थता' या शब्दाचा उपयोगच टाळणें आवश्यक आहे. कांहीं वेळां कांहीं शब्द अर्थाबद्दल गैरसमज निर्माण करण्याला कारणीभूत होतात. तशी भारताच्या धोरणासंबंधांत 'तटस्थता' या शब्दाची अवस्था आहे.

सत्तागटापासून अलिप्त रहाण्याचें भारताचें धोरण हें सध्याच्या जागतिक परिस्थितीला तोंड देण्याच्या दृष्टीनें भारतानें स्वीकारलेला एक मार्ग आहे. भारता-च्या परराष्ट्रीय धोरणाचें जें मुख्य उद्दिष्ट – जागतिक शांतता–त्याला सुसंवादी असें चालू परिस्थितींतील तें एक स्वरूप आहे. 'थंडया लढाई' च्या परिस्थितीमुळें निर्माण झालेलें तें स्वरूप आहे. पण तेंच भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें मुख्य सार नव्हे. त्या स्वरूपावर अनावश्यक भर दिल्यामुळें भारताचें धोरण 'अकरणा-त्मक' अथवा 'नकारात्मक' आहे असा भास होतो. ज्या राष्ट्रांचें सर्वच राजकारण 'थंडी लढाई' जिंकण्यावर केंद्रित झालेलें आहे, त्यांनीं भारताच्या धोरणावर अशी टीका केली तर तें समजूं शकतें. परंतु भारतीयांनीं असा गैरसमज करून घेण्याचें कांहीं कारण नाहीं.

जागतिक शांततेला ज्या कारणांमुळें धोका निर्माण होण्याचा संभव आहे – मग तीं मौलिक असोत वा तात्कालिक असोत – त्यांविरुद्ध उपाययोजना करण्याचें भारताचें धोरण आहे. साम्राज्यशाही, वर्णविद्वेष, आर्थिक व सामाजिक विषमता यांचें उच्चाटन करणें, युद्धपरिस्थिति निर्माण झाल्यास ती मर्यादित ठेवणें व सत्तागटांच्या बनावाला विरोध करणें हे या धोरणाचेच भाग आहेत. पण याशिवाय शांततेला पोषक अशा विधायक मार्गांचा पुरस्कार करणें हाहि भारताच्या धोरणाचा महत्त्वाचा भाग आहे. या विधायक मार्गां-पैकीं संयुक्तराष्ट्रांवरील श्रद्धा व सर्व राष्ट्रांबरोबर सहकार्य हे दोन मुख्य आहेत. संयुक्तराष्ट्राच्या सुरवाती-पासून भारतानें त्या संघटनेच्या कार्यांत संपूर्ण सहकार्य केलें आहे. एवढेंच नव्हें तर सध्यांच्या तंग आंतर-राष्ट्रीय परिस्थितीमध्यें ही संघटना हाच शांततेबाबत आशेचा किरण आहे अशी भारताची भूमिका आहे.

९ नेहरूंचें लोकसभेंतील भाषण, फेब्रु. १९५३; 'नेहरूज् स्पीचेस', पान २३१.







त्यामुळें संयुक्तराष्ट्र संघटना व त्याच्याशीं संलग्न असलेल्या इतर आंतरराष्ट्रीय संघटना यांच्या कार्याचा भारतानें पुरस्कारच केला आहे आणि प्रादेशिक लष्करी करारामधून ज्या संघटना निर्माण होत आहेत त्यामुळें संयुक्तराष्ट्राचें शांतता व सुरक्षा टिकविण्याचें कार्य सोपें होण्याऐवजीं अवघड होत जाईल अशी भीतीहि भारतानें व्यक्त केली आहे. शक्य तेथें संयुक्तराष्ट्रामार्फत आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविले जावेत असें भारताचें म्हणणें आहे.

संयुक्तराष्ट्रांवरील श्रद्धेप्रमाणेंच इतर राष्ट्रांबरोबर मैत्रीचे संबंध प्रस्थापित करण्याचें धोरण भारतानें प्रथमपासून पुरस्कारिलें आहे. भारताच्या शेजारील राष्ट्रांबरोबरच नव्हे तर इतर राष्ट्रांबरोबरहि स्नेहसंबंध वाढविण्याच्या दृष्टीनें व्यापारी करार, सांस्कृतिक दळणवळण व मैत्रीचे करार वगैरे मार्ग भारतानें अवलंबिले आहेत. पाकिस्तान व भारत यांचे संबंध हवे तसे स्नेहाचे नाहींत. पण हे संबंधहि बिघडूं नयेत याच दृष्टीनें भारत प्रयत्न करीत आहे. याच संबंधांत भारताच्या राष्ट्रकुटुंबाच्या सभासदत्वाचाहि उल्लेख केला पाहिजे. राष्ट्रकुटुंबाच्या सभासदत्वामुळें भारताचें स्वातंत्र्य कोणत्याहि तऱ्हेनें मर्यादित झालें नसून उलट या नव्या घटनेमुळें जागतिक घडामोडींवर अनुकूल असा परिणाम घडवून आणण्याचें भारताचें सामर्थ्य वाढलें आहे. शिवाय स्वातंत्र्यपूर्व कालांतील इंग्लंडबरोबरचे शत्रुत्वाचे संबंध बदलून आतां परस्परसहकार्याला अनुकूल असे स्नेहाचे संबंध भारतानें प्रस्थापित केले आहेत. राष्ट्राराष्ट्रांमध्यें सहकार्य वाढावें व या आंतरराष्ट्रीय सहकार्यांतून जागतिक शांततेची प्रस्थापना होण्यास मदत व्हावी या दृष्टीनें परस्परसंबंधाबद्दल सर्व राष्ट्रांनीं कांहीं पथ्यें पाळलीं पाहिजेत. तिबेटसंबंधी भारत व चीन यांचेमध्यें जो करार झाला त्यामध्यें जीं पांच तत्त्वें निर्देशिलीं आहेत व ज्यांचा नेहरु – चौ-भेटीनंतर काढलेल्या पत्रकांत पुनरुच्चार करण्यांत आला तीं तत्त्वें म्हणजेच हीं पथ्यें होत : ( १ ) परस्परांच्या प्रादेशिक एकात्मतेचा व सार्वभौमत्वाचा परस्परांनीं आदर राखावा. ( २ ) आक्रमण करूं नये. ( ३ ) अंतर्गत घडामोडींत हस्तक्षेप करूं नये. ( ४ ) परस्परांची समानता व हित पाळावीं व ( ५ ) शांततायुक्त सहजीवन उपभोगावें. या पांच तत्त्वांचा राष्ट्रांनीं अवलंब केला तर परस्परसहकार्य सुकर होईल. हीं तत्त्वें नवीं नाहींत. परंतु जुनीं असलीं तरी शांततेला पोषक असें वातावरण पसरविण्याच्या दृष्टीनें त्यांचा पुनरुच्चार व प्रसार होणें आवश्यक आहे.

### ध्येयवाद व वास्तववाद यांची सांगड

भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें ध्येय काय, तें कसें विकसित झालें व त्याच्याशीं सुसंगत अशा मार्गांचा भारतानें आतांपर्यंत कसा पुरस्कार केला आहे याचें आतांपर्यंत विवेचन केलें. भारताच्या धोरणावर असा एक नेहमीं आक्षेप घेतला जातो कीं हें धोरण ध्येयवादी आहे पण वास्तववादी नाहीं आणि त्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारामध्यें हें धोरण प्रभावी ठरणार नाहीं. हा आक्षेप यथार्थ नाहीं. भारताच्या धोरणामध्यें ध्येयवाद व वास्तववाद यांची सांगड घातली गेली आहे. नेहरूंनीं प्रांतिक कॉंग्रेस समित्यांच्या अध्यक्षांना पाठविलेल्या पत्रकांत असें म्हटलें आहे कीं धोरणामध्यें ध्येयवाद नसेल तर तें संधिसाधूपणाचें ठरेल आणि धोरण वास्तववादी नसेल तर तें अगदींच निष्प्रभ होईल.[१०] राष्ट्राचें धोरण प्रभावी होणें न होणें हें त्या राष्ट्राच्या सामर्थ्यावर अवलंबून आहे, मग तें सामर्थ्य आर्थिक असो, लष्करी असो वा नैतिक असो. जागतिक राजकारणाच्या सद्यःपरिस्थितीमध्यें स्वतःचें सामर्थ्य व आंतरराष्ट्रीय घडामोडींवर परिणाम करण्याची कुवत अजमावूनच भारत आपल्या धोरणाची आंखणी व अंमलबजावणी करीत आहे. साम्यवादी चीनच्या सरकारला मान्यता देऊन संयुक्तराष्ट्रामध्यें त्या सरकारच्या प्रतिनिधीला प्रवेश मिळावा याबद्दल भारतानें जो आग्रह धरला आहे तो आंतरराष्ट्रीय

10 " A policy must be in keeping with the traditional back-ground and temper of the country. It should be idealistic aiming at certain objectives, and, at the same time, it should be realistic. If it is not idealistic, it becomes one of sheer opportunism; if it is not realistic, then it is likely to be adventurist and wholly ineffective. " पहा : ' टाइम्स ऑफ् इंडिया,' जुलै ८, १९५४. पा. ११.








राजकारणामध्यें वास्तववादी दृष्टिकोनाचेंच प्रतीक आहे. आशियांतील घडामोडींबाबत कोणताहि निर्णय घ्याव-याचा असला तरी तो आशियांतील वस्तुस्थिति मान्य करून त्यावर आधारल्याशिवाय प्रभावी होणार नाहीं, असें भारताचें म्हणणें आहे. आणि हें वास्तववादी नाहीं काय ?

साम्यवादी समाज व इतर राष्ट्रें हे शांततामय सह-जीवन जगूं शकतील काय, ही जागतिक राजकारणांतील मोठी समस्या आहे. परंतु ही शक्यता गृहीत धरल्या-खेरीज व्यवहारच करतां येणार नाहीं. कारण, मग निर्णायक युद्ध हा एकच मार्ग शिल्लक राहतो. कोणतेंच राष्ट्र या मार्गाचा पुरस्कार करीत नाहीं. त्यामुळें शांत-तामय सहजीवनाची शक्यता गृहीत धरूनच पुढील योजना कराव्या लागतात. अंतिमतः भिन्नभिन्न पद्धतीं-चा अंगिकार करणाऱ्या राष्ट्रांचें सहजीवन अशक्य आहे असें मानणारांनासुद्धां, निदान शक्य होईल तितके दिवस सहकार्यानें वागून सहजीवन करावें अशा विचारसरणीचा अंगिकार करावा लागतो. जेवढा जास्त काळ सहजीवन चालू राहील तेवढा पुढील युद्धाचा संभवहि कमी होईल. या दृष्टीनें शांततामय सहजीवनाचा सिद्धान्त आज सर्वांना मान्य करतां येण्यासारखा आहे. इंग्लंडचे पंतप्रधान श्री. चर्चिल रशियासंबंधांत याच सिद्धान्ताच्या आधारें "त्यांनाहि संधि देऊन पहावी" अशा आशयाच्या धोरणाचा पुरस्कार करीत आहेत. सर्वच राष्ट्रांनीं या धोरणाचा स्वीकार करावा, साम्यवादी चीनलाहि शांततामय सह-जीवन जगण्याची संधि द्यावी व जागतिक शांततेचा उपलब्ध असलेला एक मार्ग अवलंबून पहावा अशी भारताची भूमिका आहे. ता. १५।७।५४

---

## आंतरराष्ट्रीय संबंधाचें नवें अधिष्ठान

"इंडो-चीनमध्यें गेलीं ७ वर्षे चालू असलेल्या युद्धाचा शेवट झाला. ही घटना केवळ आशियाच्या दृष्टीनें नव्हे तर जगाच्या दृष्टीनेंहि अत्यंत महत्त्वाची अशी घडून आलेली आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर आज पहिल्यांदाच सर्व राष्ट्रांमध्यें शांति नांदूं लागली आहे. . . . . . इंडो–चीनमधील संस्थानें कोणत्याहि लष्करी गटांत वा करारांत सामील होणार नाहींत अशी जी घोषणा करण्यांत आलेली आहे ती स्वागतार्ह आहे. याचाच अर्थ असा कीं तीं संस्थानें कोणत्याहि गटांत सामील न होतां शांतीच्या क्षेत्रांत नांदून, शांतीचें क्षेत्र वाढवतील.

"भारत आणि चीन, ब्रह्मदेश व चीन यांच्यामधील परस्पर संबंध ज्या पांच तत्त्वांच्या आधारें प्रस्थापित करावयाचा करार झाला आहे, तीं पांच तत्त्वें स्वागतार्ह अशींच आहेत. परस्परांच्या सार्वभौमत्वास व प्रादेशिक एकात्मतेस मान्यता, आक्रमण न करणें व परस्परांच्या घडामोडींत हस्तक्षेप न करणें इत्यादि गोष्टी या पांच तत्त्वांत अंतर्भूत असून हीं पांच तत्त्वें अधिकाधिक व्यापक प्रमाणावर लागूं करण्यासारखीं आहेत. तशीं तीं जेथें जेथें लागूं केलीं जातील तेथें तेथें त्यांच्या आधारावर जगाला आज आवश्यक असलेलें शांतता-युक्त सहजीवन नांदूं शकेल.

"प्रत्येक देशाला आपली स्वतःची अशी राजकीय व आर्थिक व्यवस्था बनवायचा हक्क आहे; कोणत्याहि देशानें बाहेरून वा आंतून दुसऱ्या देशाच्या राजकीय व आर्थिक व्यवस्थेंत हस्तक्षेप करतां कामा नये — ह्या जाणिवेवरच देशांमध्यें परस्पर शांतीचे व सलो-ख्याचे संबंध अवलंबून असून; राष्ट्रांचें सहजीवन व सहकार्य शक्य आहे . . . . . ."

—– कॉंग्रेस कार्यकारिणीच्या ठरावांतून
( अजमीर ) २३ – ७ – ५४












श्री. कृष्ण नारायण फडके

# इण्डोचीनमधील स्वातंत्र्य-संग्रामाचीं सात वर्षें

२६ एप्रिल १९५४ पासून जिनीव्हा येथें सुरू झालेल्या परिषदेमुळें गेलीं आठ वर्षें आशियाखंडाच्या एका कोपऱ्यांत सतत चालू असलेल्या **इण्डोचीन**सारख्या एका लहानग्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यसंग्रामाला जागतिक राजकारणामधील अव्वल दर्जाच्या प्रश्नाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. वास्तविक, केनिया, मोरोक्को अल्जेरिस् इत्यादि देशांमध्यें अशाच स्वरूपाचे स्वातंत्र्यसंग्राम गेलीं कांहीं वर्षें चालू आहेत. असें असतां फ्रेंचव्याप्त इण्डोचीनमधील संग्रामाला एकाएकीं येवढा उठाव कां मिळावा ? – असा प्रश्न मनांत येणें स्वाभाविक आहे. परंतु ह्या प्रश्नाचा उलगडा करण्यापूर्वी गेल्या महायुद्धाच्या समाप्तीपासून आजवर चालू असलेल्या इण्डोचीनच्या स्वातंत्र्यसंग्रामाचें व त्याच्या पूर्वपीठिकेचें समालोचन करणें आवश्यक आहे.

## भौगोलिक व ऐतिहासिक परिचय

वास्तविक हिंदुस्थान व चीन ह्या दोन देशांच्या सरहद्दीमधील विस्तीर्ण भूप्रदेशाला इण्डोचायना अथवा हिंद-चीन ह्या नांवानें संबोधणें उचित ठरेल. ह्या खंडप्राय प्रदेशांत ब्रह्मदेश, सयाम, फ्रेंच इण्डोचायना व मलाया ह्या प्रचलित राष्ट्रांचा समावेश होतो.

हिंद-चीन भूप्रदेशाची सध्यांची जी विभागणी आहे ती ब्रिटिश, फ्रेंच व डच आक्रमकांच्या मुलुखगिरीच्या व त्यांच्या अन्तर्गत संबंधांच्या सोयीप्रमाणें बदून आलेली आहे. तेथें आज जे वेगवेगळाले राज्यविभाग आहेत ते राष्ट्रीय एकीकरणाच्या अथवा विमोचनाच्या लक्ष्यांमधूनं प्रस्थापित झालेले नाहींत. ह्या प्रदेशांपैकीं गेल्या शतकाच्या मध्यापासून सुमारें २५ वर्षांच्या काळांत जे भूविभाग फ्रेंचांनीं जिंकून घेतले अथवा व्यापिले त्यांना साकल्यानें हल्लीं **इंडोचायना** अथवा **फ्रेंच इंडोचायना** ह्या नांवानें ओळखिण्यांत येतें.




“ एकाद्या तत्त्वावर मात करण्याचा एकच उपाय असूं शकतो. तो म्हणजे जवळ उच्चतर तत्त्व असणें हा होय. इण्डोचीनमधील जनतेची कत्तल करण्यासाठीं रणगाडे पाठवून आम्ही कोणत्या उच्चतर तत्त्वाचा पुरस्कार करणार आहोंत ? आम्हीं स्वातंत्र्याच्या साऱ्या तत्त्वांना सर्वस्वीं इतके पारखे झालों आहोंत काय ? ”

-- सीनेटर एडवर्ड जॉनसन

# इण्डोचीनमधील स्वातंत्र्य-संग्रामाचीं सात वर्षें

प्रस्तुत लेख ह्याच प्रदेशामधील घडामोडींपुरता मर्यादित असल्यानें त्याचाच उल्लेख यापुढें ह्या लेखांत इण्डोचीन अथवा हिंद-चीन ह्या नांवानें करण्यांत येईल.

ह्या हिंदचीनचें क्षेत्रफळ १९४९ सालच्या अंदाजाप्रमाणें सुमारें २८६०० चौरस मैल असून तेथील लोकसंख्या अदमासें २,७०,३०,००० आहे. ह्या लोकसंख्येपैकीं राज्यकर्त्या वंशाची म्हणजे फ्रेंचांची संख्या अवघी ४३००० भरेल. कोचीन-चायनाची वसाहत बहुतांशीं फ्रेंचांनीं व्यापिलेली आहे. हिंद-चीनची सरहद्द उत्तरेकडे चीनच्या क्वँटुंग, क्वांगसी व युन-यान ह्या इलाख्यांना, वायव्येस ब्रह्मदेशला व पश्चिमेस सयामला भिडलेली आहे. ह्या प्रदेशांत उत्तरेकडील टॉन्‌किनच्या आखातांत चांगलीं बंदरें आहेत व तेथें आधुनिक साधनांनीं व लष्करी सोयींनीं सुसज्ज असा आरमारी तळ उभारतां येणें शक्य आहे. टॉन्‌किन्‌चें आखात चीनच्या सरहद्दीला भिडलेलें आहे. येवढ्यावरून अशा मोक्याच्या ठिकाणच्या आरमारी तळाचें महत्त्व कोणाच्याहि सहज ध्यानीं येईल. त्याचप्रमाणें दक्षिण टोंकास असलेलें कामेरानचें प्रशस्त आखात हें देखील अशा नाविक तळाच्या उभारणीस अत्यंत सोयीचें आहे.

फ्रेंचांच्या आगमनापूर्वी कोचीन चायना, आनाम व टॉन्‌किन् मिळून बनलेलें आनामचें राज्य, ख्मेरचें राज्य आणि सयाम ह्यांच्यामध्यें अन्तःकलह सदैव चालू असे. फ्रेंच आक्रमकांनीं ह्या कलहाचा पुरेपूर फायदा घेतला. सन १८६२ ते १८८७ ह्या वर्षांच्या कालावधींत आनाम व कम्बोडिया काबीज करून फ्रेंचांनीं इण्डोचायनीज युनियनची प्रस्थापना केली. त्यानंतर सयाम बरोबर दीर्घकाल झगडा करून लाओ हा मुलुख देखील त्यांनीं ह्या युनियनमध्यें सामील करून घेतला; अशा तऱ्हेनें केवळ राज्यकारभाराच्या सोयीसाठीं टॉन्‌किन्, आनाम अथवा व्हिएत्-नाम्, लाओ व काम्बोडिया ह्या प्रदेशांचें एकीकरण म्हणण्यापेक्षां, एकत्रीकरण त्यांनीं घडवून आणलें.

फ्रेंच अमदानींत कोचीन-चायना ही वसाहत वगळून बाकीच्या प्रदेशाची विभागणी व्हिएत्-नाम्, ख्मेर व लाओ ह्या तीन विभागांत झालेली होती. ह्या प्रत्येक विभागासाठीं एका फ्रेंच कमिशनरची व त्यावर एका हाय कमिशनरची नेमणूक करण्यांत आलेली असे. हाय कमिशनरच्या मदतीसाठीं त्यानें नियुक्त केलेलें आठ जणांचें एक सल्लागारमंडळ असे. ह्याशिवाय ह्या प्रत्येक विभागावर एकेका मांडलिक राजाची सत्ता चालत असे.

व्हिएत्-नाम्, पॅथेत्-लाओ व काम्बोडिया ह्या तीन संस्थानांपैकीं व्हिएत्-नाम् हेंच लोकसंख्येच्या दृष्टीनें सर्वांत मोठें असून सांस्कृतिक व आर्थिक दृष्ट्याहि तेंच सर्वांच्या अग्रभागीं आहे.

हिंद-चीनची भूमि नैसर्गिक संपत्तीच्या बाबतींत अत्यंत संपन्न आहे. परंतु तेथील नैसर्गिक साधन-सामग्रीचीं अनेक कोठारें अद्याप शोधिलीं गेलीं नाहींत. पहिल्या महायुद्धापर्यंत तांदुळाचा व्यापार हाच येथील फ्रेंच वसाहतवाल्यांचा प्रमुख धंदा होता. म्हणून ह्या प्रदेशापैकीं फार मोठा भाग फ्रेंच वसाहतवाल्यांनीं सक्तीनें भाताच्या लागवडीखालीं आणला. तेथील तांदुळाची निर्यात हाच फ्रेंच व्यापाऱ्यांच्या नफेबाजीचा झरा असल्यानें ही निर्यात अत्यंत निर्दयपणानें वाढविण्यांत येई. हिंदचीनच्या काम्बोडियासारख्या विभागांत दुष्काळानें सहस्रावधी लोक मृत्युमुखीं पडत असले तरी तांदुळाच्या निर्यातींत खंड पडूं देण्यांत येत नसे.

टान्‌किन्‌चें सुपीक खोरें ही अनामीची कुळभूमि होय. तेथून किनाऱ्यालगतचा सयामच्या आखातापर्यंतचा मुलुख आनामींनीं मुलुखगिरी करून जिंकला. कोचीन-चायनाच्या सुपीक खोऱ्यांत देखील त्यांचीच लोकसंख्या अधिक आहे. आनामप्रदेशांमधील मूळ रहिवाशांना आनामी, मलाया व ख्मेर लोकांच्या मुलुखगिरीमुळें डोंगराळ व जंगली विभागाचा आश्रय घेणें भाग पडलें. अशा मान, मॉंग, मॉय, खास इत्यादि आदिवासी जमाती आपल्याकडील आदिवासी जमातींप्रमाणेंच टोळीवाल्याचें व अर्ध॰गुलामगिरीचें जीवन जगत असतात. इतर सर्व वसाहत-देशांप्रमाणें हिन्द-चीनची अर्थव्यवस्था शेती-प्रधान असल्यानें शेतीवरील लोकसंख्येचा भार एकसारखा वाढत गेला आहे. लोकसंख्येचा भार व साम्राज्यशाही पिळवणूक ह्यांमुळें तेथील शेतीचा धंदा अत्यंत खालावलेल्या स्थितीस पोहोचलेला होता व कंगाल शेतकऱ्यांची संख्या एकसारखी वाढत होती. ह्या कंगाल शेतकऱ्यांतून पहिल्या महायुद्धानंतरच्या काळांत रबराच्या शेतवाड्या, खाणी व कारखाने ह्यांना

स्वस्त मजुरांचा भरपूर पुरवठा होऊं शकला. ह्याशिवाय सहस्त्रावधी मजुरांची पॅसिफिक महासागरांतील बेटांवर मुदतबंदीचे मजूर म्हणून निर्यात करण्यांत येऊं लागली.

## राष्ट्रीयत्वाचा उगम व विकास

पहिल्या महायुद्धानंतर कच्च्या रबराला वाढती बाजारपेठ मिळूं लागल्यानें रबराची लागवड व व्यापार करणारा वर्ग भरभराटीस पोहोंचला. ह्याच काळांत सायगांव ते हॅनॉय हा रेल्वेमार्ग बांधण्यांत आला. हँगे नदीच्या खोऱ्यांत कोळशाचा सांठा भरपूर भूपृष्ठालगत असल्यानें तेथें कोळशाच्या खाणी सुरू झाल्या. तसेंच, ह्या टॉन्किन्च्या खोऱ्यांत शिसें, झिंक व इतर नॉनफेरस धातू ह्यांची पैदास वाढत गेली. ह्या औद्योगिक उत्पादनाच्या व व्यापाराच्या वाढीमुळें हिन्दचीनमध्यें नव्या अनामी भांडवलदार वर्गाचा व कामगारवर्गाचा उदय झाला. आणि ह्या वर्गाच्या उदयाबरोबर तेथें विशेषतः आनामी जनतेमध्यें, राष्ट्रीय अस्मितेची जाणीव फैलावत गेली. ह्याच काळांत अनाममध्यें राष्ट्रीय पक्षाची स्थापना झाली. ह्या पक्षाचा कार्यक्रम सन्-यत्-सेनच्या त्रिसूत्रीवर आधारलेला होता. १९३० सालीं हिन्दचीनमध्यें कम्युनिस्ट पक्षाची स्थापना झाली. हिन्दचीनच्या सध्याच्या स्वातंत्र्य-संग्रामाचा सूत्रधार हो-चि-मिन्ह हा देखील राष्ट्रीय चळवळींतूनच पुढें आला. पहिल्या महायुद्धानंतर व्हर्साय येथें तहपरिषद् चालू असतां हो-चि-मिन्ह ह्यानें व्हर्साय राजवाड्यांत घुसून आपल्या देशाच्या स्वातंत्र्याची मागणी लॉइड जॉर्ज, वूड्रो विल्सन् व क्लेमेन्को ह्यांचेपुढें मांडली होती असें ऐकिवांत येतें. १९३० सालीं व्हिएत्-नाममध्यें राष्ट्रीय पक्षाच्या नेतृत्वाखालीं बंडाचा उठाव करण्यांत आला होता. परंतु फ्रेंचांनीं तो उठाव निर्दयपणें दडपशाही करून चिरडून टाकला.

## व्हिएत्-नामच्या स्वातंत्र्याचा उदय

दुसऱ्या महायुद्धांत फ्रान्सचा पाडाव झाल्यानंतर विशीसरकारच्या अनुमतीनें जपाननें हिंदचीनवर कबजा केला. १९४० ते १९४५ ह्या जपानी आक्रमणाच्या काळांत व्हिएत्-नामी जनतेनें जपानच्या आक्रमणाचा अविरतपणें सशस्त्र प्रतिकार केला. ह्या प्रतिकाराच्या संघटनेच्या कार्यांत हो-चि-मिन्हनें पुढाकार घेऊन व्हिएत्-मिन्हची अथवा 'व्हिएत्-नाम् स्वातंत्र्यसंघा'ची स्थापना केली. त्या संघटनेमध्यें लाओ व काम्बोडिया ह्या प्रदेशांतील देशभक्तांनाहि सामील करून घेण्यांत आलें होतें. 'व्हिएत्-नाम् स्वातंत्र्य-संघ' ही संघटना लोकशाही आघाडीच्या स्वरूपाची होती. तिच्यांत अनेक पक्ष व संघटना समाविष्ट झालेल्या होत्या.

१९४५ च्या ऑगस्ट महिन्यांत मुक्त प्रदेशांतील व्हिएत्-नामी जनतेची परिषद् भरविण्यांत आली. ह्या परिषदेंत व्हिएत्नाममध्यें सार्वत्रिक सशस्त्र उठाव करण्याचा निर्णय घेण्यांत आला. त्याचें मार्गदर्शन करण्यासाठीं हो-चिन्-मिन्हच्या अध्यक्षत्वाखालीं एक समिति नियुक्त करण्यांत आली. सार्वत्रिक उठावाच्या परिषदेच्या निर्णयास व्हिएत्-नाममधील जनतेनें उत्साहानें पाठिंबा दिला. ह्या सार्वत्रिक उठावाच्या जोरावर ता. १९ ऑगस्ट रोजीं व्हिएत्-मिन्हनें जपानी फौजांच्या व त्यांचा हस्तक बाओ-दाय ह्याच्या हातून सत्ता जिंकून घेतली आणि विशी व जपानी फौजांपासून जिंकलेल्या शस्त्रसंभारानिशीं व्हिएत्-मिन्हच्या मुक्तिसेनांनीं विजयोत्सवानें हॅनॉय ह्या राजधानीच्या शहरांत प्रवेश केला. ता. २ सप्टेंबर १९४५ रोजीं तेथें तात्पुरत्या राष्ट्रीय सरकारच्या प्रस्थापनेची घोषणा करण्यांत येऊन हो-चिन्-मिन्हची राष्ट्रीय सरकारचा पहिला अध्यक्ष म्हणून निवड करण्यांत आली.

राष्ट्रीय सरकारची प्रस्थापना झाल्या दिवसापासून त्याच्या नेत्यांनीं व्हिएत्-नाममध्यें नवलोकशाहीची प्रस्थापना करण्याचें उद्दिष्ट स्वतःपुढें ठेविलें होतें. तात्पुरत्या राष्ट्रीय सरकारचा जो कार्यक्रम जाहीर करण्यांत आलेला होता त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. त्या कार्यक्रमांत खालील बाबींचा समावेश करण्यांत आलेला होता :

(१) आठ तासांचा दिवस; अकिंचन व वयातीत इसमांना सामाजिक संरक्षण.

(२) बेकारी व वेश्याव्यवसाय ह्यांचें निर्मूलन.

(३) धंदेशिक्षणाच्या शाळांची स्थापना.

(४) बालसंगोपनकेन्द्रांची व बालकमंदिरांची स्थापना

(५) दारुबंदी व अफूबंदी.

१९४६ सालच्या जानेवारी महिन्यांत व्हिएत्-नाममध्यें सार्वत्रिक मतदानपद्धतीनें राष्ट्रीय लोकसभेच्या निवडणुकी घेण्यांत आल्या. तिच्यांत ९० टक्के व्हिएत्-

नामी जनतेनें भाग घेतला होता. ह्या निवडणुकींत व्हिएत्-नाम स्वातंत्र्यसंघाचे उमेदवार मोठ्या संख्येनें निवडून आले. परंतु त्यांच्याशिवाय लोकशाही पक्षाचे ४५, व्हिएत्-नाम क्रान्तिकारक पक्षाचे २२, समाजवादी पक्षाचे ४ व इतर अपक्षीय ९० ह्याप्रमाणें उमेदवार निवडून आले होते. राष्ट्रीय सरकारच्या प्रस्थापनेचे वेळीं आनामचा त्यावेळचा राजा बाओ-दाय ह्यानें राज्यत्याग करून हो-चिन्-मिन्हच्या राष्ट्रीय सरकारमध्यें सल्लागाराची जागा पत्करली.

## दोस्तांच्या दगलबाजीस प्रारंभ

परंतु हॅनॉय येथें राष्ट्रीय सरकारची स्थापना होते न होते तोंच ब्रिटिश फौजा हिन्दचीनच्या किनाऱ्यावर उतरल्या व त्यांनीं व्हिएत्-मिन्ह फौजांविरुद्ध चढाई सुरू केली. ब्रिटिश फौजा शस्त्रसामग्रीनें अधिक सुसज्ज असल्यानें प्रारंभीं त्यांना कांहीं थोडे विजय मिळवितां आले. ब्रिटिश फौजांच्या पाठोपाठ फ्रेंच फौजा व्हिएत्-नामच्या किनाऱ्यावर उतरल्या. जपानी आक्रमणाच्या काळांत दोस्तराष्ट्रांच्या सेनांनीं व्हिएत्-मिन्हच्या फौजांबरोबर सहकार्य केलें असलें तरी तें गरजवंतांचें सहकार्य होतें. कारण, ता. २५ मार्च १९४५ रोजीं फ्रान्सच्या निर्वासित हंगामी सरकारनें युद्धसमाप्तीनंतर इन्डोचीनवर आपलें अधिराज्य पुन्हा कायम करण्याचा निर्धार जाहीर केला होता.

ता. २३ सप्टेंबर १९४५ रोजीं फ्रेंच फौजा कोचीन–चायनाच्या किनाऱ्यावर उतरल्या व त्यांनीं अचानक हल्ला करून सायगांव शहर जिंकलें. ता. २ मार्च रोजीं व्हिएत्-नामच्या लोकसत्ता-प्रजा-राज्यानें जाहीरनामा काढून व्हिएत्-नामच्या मायभूमीचें, तिच्या स्वातंत्र्याचें व व्हिएत्-नामी जनतेच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काचें संरक्षण करण्याचा व्हिएत्-नाम् राष्ट्रीय परिषदेचा निर्धार असल्याचें जाहीर केलें.

१९४६ च्या जानेवारी महिन्यांत व्हिएत्-नाम लोकशाही प्रजासत्ताक राज्याच्या लोकसभेच्या निवडणुकी घेण्यांत आल्या. त्या निवडणुकांत अंदाजी ९० टक्के जनतेनें हो-चि-मिन्हनें बनविलेल्या मंत्रिमंडळावर विश्वास व्यक्त करून नवी राज्यघटना तयार करण्याचें कार्य हातीं घेतलें.

## ६ मार्च १९४६ चा करार

तडकाफडकीं विजय मिळण्याची आशा फोल ठरल्यानें अखेर फ्रान्स व व्हिएत्-नामचें लोकशाही प्रजासत्ताक ह्यांच्यामध्यें ता. ६ मार्च १९४६ ला तात्पुरता करार झाला. ह्या कराराच्या पहिल्या कलमान्वयें व्हिएत्-नाम् प्रजासत्ताकाच्या स्वातंत्र्यास व अविभाज्यत्वास फ्रान्सनें मान्यता दिली होती व त्याचें स्वतंत्र सरकार, कायदेमंडळ व लष्कर असावें व त्याला संपूर्ण आर्थिक स्वातंत्र्य असावें, ह्या अटीहि फ्रान्सनें मान्य केल्या होत्या. ह्याच कराराच्या दुसऱ्या कलमान्वयें जपानी युद्धकैद्यांवर पहारा ठेवण्याच्या कामासाठीं चिनी फौजांच्या जागीं ज्या फ्रेंच फौजा व्हिएत्-नाममध्यें आणण्यांत येतील त्या, युद्धकैद्यांचें स्थलांतर होतांच अगर जास्तींत जास्त १० महिन्यांच्या आंत, फ्रान्सनें काढून घ्याव्यात; तसेंच, व्हिएत्-नाममध्यें असलेल्या इतर फ्रेंच फौजांपैकीं दरवर्षीं एक पंचमांश फौजा–ह्याप्रमाणें पांच वर्षांत सर्व फौजा फ्रेंचांनीं परत न्याव्यात, असें ठरलें होतें. ह्याशिवाय उभय पक्षांनीं परस्परांवरील लष्करी हल्ले तावडतोब थांबवावेत असेंहि ह्या करारान्वयें ठरलें होतें. फ्रेंच युनियनमध्यें प्रजासत्ताकाचें स्थान काय असावें वगैरे बाबींसाठीं उभयपक्षीं पुन्हां वाटाघाटी व्हावयाचें ठरलें होतें. व्हिएत्-नाम्, लाओ व काम्बोडिया ह्यांच्या संयुक्तीकरणाचा प्रश्न सार्वत्रिक मतदानानें ठरविण्यांत यावयाचा होता.

एप्रिल १९४६ मध्यें अनिर्णीत प्रश्नांसंबंधीं सायगांव-जवळील दलात् नांवाच्या खेड्यांत फ्रान्स व व्हिएत्-मिन्ह सरकार ह्यांच्या दरम्यान पुन्हा वाटाघाटी सुरू झाल्या. परंतु त्यांतून कांहीं निष्पन्न न झाल्यानें त्या जून महिन्यांत पॅरिसमध्यें पुन्हा व्हाव्यात असें ठरलें.

परंतु ता. ६ मार्चचा करार करण्यांत फ्रान्सचा हेतु फ्रेंच फौजांना व्हिएत्-नाममध्यें प्रवेश व संचार-स्वातंत्र्य मिळवावें येवढाच होता. पॅरिसमध्यें वाटाघाटी सुरू होण्यापूर्वीं व आधींहि फ्रेंचांनीं चढाईचे हल्ले चालू ठेविले व टॉन्‌किन्‌चा किनारा व इतर बरेच प्रदेश काबीज केले. तसेंच, कोचीन-चायना ह्या फ्रेंच वसाहतीचें स्वतंत्र सरकार प्रस्थापित केलें. पुढें ता. १ ऑगस्ट १९४६ रोजीं इन्डोचायनामधील लष्करी प्रमुख ॲड्‌मिरल द् आर्लेन्ज्यू ह्यानें ता. १ आगस्ट १९४६ रोजीं दलात येथें संयुक्त इण्डोचीनची परिषद् बोलाविली. त्यामुळें पॅरिसमध्यें सुरू असलेलीं बोलणीं

फिसकटलीं. तरीपण तीं पुन्हा सुरूं करणें शक्य व्हावें म्हणून व्हिएत्-नाममध्यें शांतता प्रस्थापित करण्या-साठीं हो-चि-मिन्हनें चिकाटीनें प्रयत्न सुरूं ठेविले होते. त्यांना कांहींसें यश येऊन ता. १४ सप्टेंबर १९४६ रोजीं फ्रान्स व व्हिएत्-नाम् ह्यांच्यामध्यें दुसरा तात्पुरता शस्त्रसंधीच्या स्वरूपाचा करार घडून आला. परंतु पुनःश्च ॲड्मिरल द आर्लेन्ज्यूनें सप्टेंबर-कराराचा भंग केल्याचा आरोप व्हिएत्-मिन्ह सरकारवर करून युद्धास तोंड फोडलें. ता. १७ व ता. १९ डिसेंबर रोजीं मेजर फॉन्डे व जनरल मॉलेरे ह्यांनीं व्हिएत्-मिन्ह सरकारला निर्वाणीचा खलिता पाठवून हॅनाय ह्या राजधानीमधील प्रजासत्ताक फौजांच्या निःशस्त्रीकरणाची मागणी केली. अर्थात्, व्हिएत्-मिन्ह-सरकारपुढें प्रतिकाराच्या मार्गावांचून दुसरा मार्ग उरला नाहीं. ता. १९ डिसेंबर रोजीं हो-ची-मिन्हनें फ्रान्सच्या अध्यक्षाकडे रक्तपाती चढाई थांबविण्याची मागणी केली. १९४७ च्या एप्रिलमध्यें इमिल बालार्टे ह्याची फ्रेंच हायकमिशनर म्हणून नेमणूक झाल्यानंतर व्हिएत्-मिन्ह सरकारच्या परराष्ट्रीय मंत्र्यानें शस्त्रसंधीसाठीं व सारे विवाद्य प्रश्न वाटाघाटींनीं सोडविण्यांत यावेत ह्यासाठीं बोलणीं सुरूं केलीं. परंतु ता. १३ मे १९४७ रोजीं बालार्टनें धाडलेल्या उत्तरांत शस्त्रसंधीच्या अटी म्हणून व्हिएत्-मिन्हनें सर्व लष्करी हल्ले तावडतोब थांबवावेत व तीन आठवड्याच्या आंत सर्व शस्त्रें फ्रेंचांच्या हवालीं करावींत आणि फ्रेंच फौजांना सर्वत्र संचारस्वातंत्र्य मिळावें अशा म्हणजे वस्तुतः संपूर्ण शरणागतीच्या मागण्या केल्या. स्वाभाविकच तेथून पुढें व्हिएत्-नाममधील स्वातंत्र्य-युद्धाला उग्र व प्रखर स्वरूप येत गेलें व अमेरिकेच्या हस्तक्षेपामुळें पुढें त्यांत भर पडली.

१९४८ च्या मे महिन्यांत पॅरिसमध्यें रंगेल जीवनांत दंग असणाऱ्या बाओ-दायला परत आणून त्याची व्हिएत्-नामच्या सम्राट्-पदावर प्रस्थापना करण्यांत आली व अमेरिकेच्या दबावामुळें बाओ-दायच्या सरकारला स्वतंत्र लष्कर उभारण्याचा हक्क देण्यांत आला. परराष्ट्रीय धोरणाच्या बाबतींतहि पुष्कळ स्वातंत्र्य देण्यांत आलें. येथपासून इण्डोचीन युद्धामधील अमेरिकन पर्वाला प्रारंभ झाला.

चँग काय-शेकच्या पराभवानंतर आशियाखंडांतील अमेरिकेच्या आर्थिक व लष्करी आक्रमणाचा रोख इण्डोचीनकडे वळला. अमेरिकेच्या दडपणामुळेंच १९४७ ते १९५३ ह्या सहा वर्षांत हो-चि-मिन्हनें शस्त्रसंधीसाठीं आंतरराष्ट्रीय रेडक्रॉसच्या द्वारा, रेडिओद्वारा व निरनिराळ्या वृत्तसंस्थांच्या द्वारा शस्त्रसंधि घडवून आणण्यासाठीं वारंवार केलेले प्रयत्न वाया गेले. कम्युनिस्टांना शस्त्रबळाशिवाय व अत्याचाराशिवाय इतर सर्व उपाय वर्ज्य असतात असें वेळींअवेळीं आक्रंदन करणारांनीं ह्या काळांत हो-चि-मिन्हनें शांततेसाठीं केलेल्या आर्जवी प्रयत्नांचें स्वतंत्र जगाच्या नेत्यांकडून कोणत्या प्रकारें स्वागत करण्यांत आलें ह्याचा इतिहास जरूर नजरेखालून घालावा.

१९५३ मध्यें कोरियामध्यें शस्त्रसंधि झाल्याकारणानें चीनवर आक्रमण करण्याचा एक मोका हुकला. म्हणून तेंच उद्दिष्ट इण्डोचीनमधील युद्धाचें 'आन्तरराष्ट्रीयीकरण' करून साधण्याचा डाव रचण्यास अमेरिकेनें सुरवात केली.

१९५३ च्या नोव्हेंबर महिन्यांत '**एक्स्प्रेसेन**' ह्या स्वीडिश पत्राला हो-चि-मिन्हनें दिलेल्या मुलाखतीच्या ज्या प्रतिक्रिया फ्रान्स व अमेरिका ह्या देशांतील अधिकृत गोटांत व कम्युनिस्ट पत्रें वगळून इतर वजनदार वर्तमानपत्रांत उठल्या त्यांवरून इण्डोचीनमधील युद्ध हें फ्रान्सचें युद्ध राहिलें नसून अमेरिकेच्या जागतिक युद्धाच्या तयारीचा तो एक भाग होता ही गोष्ट स्पष्ट झाली. हो-चि-मिन्हच्या ह्या मुलाखतीसंबंधीं '**लमाण्डे**' ह्या फ्रेंच पत्रानें "फ्रेंच सरकारची तयारी असेल तर दुसरा पक्ष देखील वाटाघाटींना तितकाच उत्सुक असल्याबद्दल त्याची खात्री पटेल" असा अभिप्राय व्यक्त केला होता. ह्याच संबंधांत '**कॉम्बट**' हें पत्र म्हणतें : "'एक्स्प्रेसेन' मुलाखतीवरून जी एक गोष्ट सिद्ध झाली आहे ती कोणाहि प्रामाणिक माणसास नाकारतां येणार नाहीं. ती म्हणजे व्हिएत्-मिन्हबरोबर वाटाघाटी करणें शक्य आहे." ह्याच्या उलट, '**वाशिंग्टन-पोस्ट**'चा लेखक राबर्ट लिहितो : "'हो'च्या ह्या मुलाखतीनें वॉशिंग्टनमध्यें बरीच चिंता निर्माण झालेली आहे." '**वॉशिंग्टन स्टार**' ह्या पत्रानें तर अमेरिकन राज्यकर्त्यांचें मनोगत अधिक स्वच्छ शब्दांत व्यक्त केलें होतें : "इण्डोचायनामध्यें शांतता प्रस्थापित








होण्यासाठी वाटाघाटी करण्यास फ्रान्सला परवानगी देण्याचें धाडस अमेरिका सध्यां तरी करणें शक्य नाहीं. मग शस्त्रसंधीच्या अटी कांहींहि असोत. हो-चि-मिन्हनें संपूर्ण शरणागति दिली तरी शस्त्रसंधीस मान्यता देणें ही घोडचूक होईल. "

वरील अभिप्रायामधील 'परवानगी' व 'धाडस' हे शब्द विशेष अर्थपूर्ण आहेत.

## अमेरिकेचे युद्धहेतू

इण्डोचीनमधील युद्ध चालू ठेविण्यांत अमेरिकेचे युद्धहेतू अमेरिकन पत्रांमधून व जबाबदार अमेरिकन मुत्सद्द्यांच्या भाषणांवरून स्पष्ट झालेले आहेतः अमेरिकेचा पहिला उद्देश इण्डोचीनमधील फ्रेंचांचें आर्थिक व राजकीय वर्चस्व नष्ट करून वरील दोन्ही क्षेत्रांत अमेरिकेचें प्रभुत्व स्थापन करणें हा आहे. अमेरिकेच्या ह्या कारवायांसंबंधीं 'ल ट्रायब्यून द नेशन्स' हें पत्र लिहितें: "इण्डोचायना- (बाओदाय सरकार) ला लष्करी व आर्थिक मदत देऊन फ्रान्सच्या आर्थिक हितसंबंधांवर कब्जा करण्यांत येत असल्याची कबुली प्रत्यक्ष अमेरिकेच्या परराष्ट्रीय खात्याकडून देण्यांत येत आहे." "इण्डोचायनाचा प्रदेश टिन्, तेल, रबर व कच्चें लोखंड ह्यांनीं संपन्न आहे... ह्या प्रदेशाला फार मोठें लष्करी महत्त्व आहे. तेथें अव्वल दर्जाचे आरमारी व वैमानिक तळ आहेत" असें अमेरिकन परराष्ट्रमंत्री डलेस ह्यानें (ता. २९ मार्च १९५४) 'ओव्हरसीज प्रेस' क्लबापुढें केलेल्या भाषणांत काढलेले उद्गार व इण्डोचायनाच्या प्राप्तीसाठीं "केवढीहि मोठी जुगार खेळावी लागली तरी महाग नाहीं" हें 'न्यू यार्क टाइम्स' नें व्यक्त केलेलें मत अमेरिकेच्या वरील युद्धहेतूवर प्रकाश पाडणारें आहे.

अमेरिकेचा दुसरा हेतु इण्डोचायनामधील युद्ध चालूं ठेवण्यास भाग पाडून फ्रान्सला मनुष्यबळाच्या दृष्टीनें व आर्थिक दृष्टीनें कुमकुवत बनवून त्यांस युरोपियन संरक्षणसमूहांत सामील होण्यास व जर्मनीच्या पुनःशस्त्रीकरणास मान्यता देण्यास भाग पाडण्याचा आहे. हो-चि-मिन्हच्या वर उल्लेखिलेल्या मुलाखतीचे फ्रान्समध्यें जे पडसाद उठले त्यामुळें अमेरिकेनें या बाबतींत फ्रान्सला उघडउघड धमक्या देण्यास सुरवात केलेली आहे.

अमेरिकेचा तिसरा युद्धहेतु आर्थिक मदत थांबविण्याच्या धमक्या देऊन बाओ-दाय-सरकारच्या व कम्बोडिया व पॅथेट-लाओ ह्यांच्या संपूर्ण स्वातंत्र्यास मान्यता देण्यास फ्रान्सला भाग पाडावयाचें व मग दक्षिण कोरियाप्रमाणें ह्या 'स्वतंत्र' राष्ट्रांबरोबर लष्करी व आर्थिक मदतीचे करार करून इण्डोचीनमध्यें लष्करी, आरमारी व वैमानिक तळ मिळवावयाचे, आणि लष्करी सल्लागारांच्या व तज्ज्ञांच्या द्वारा त्यांच्या लष्कराच्या दोऱ्या स्वतःच्या हातीं घ्यावयाच्या – हा आहे. ह्या हेतूबाबतहि अमेरिकन मुत्सद्द्यांनीं फारसा आडपडदा ठेविलेला नाहीं.

अमेरिकेचा चौथा व सर्वांत महत्त्वाचा युद्धहेतु कोरियामधील शस्त्रसंधीनें लोकसत्ताक चीनवर आक्रमण करण्याचा हुकलेला डाव इण्डोचीनमधील युद्धाला आन्तरराष्ट्रीय स्वरूप देऊन साधावा हा आहे. ह्यासाठीं जिनिव्हा परिषद भरण्यापूर्वीच ब्रिटनला ह्या युद्धांत, व पर्यायानें चीनविरुद्ध युद्धांत खेचण्यासाठी अमेरिकन् परराष्ट्रमन्त्री डलेस ह्यानीं ह्या वर्षीच्या मार्च व एप्रिल महिन्यांत भगीरथ प्रयत्न केले.

लोकसत्ताक चीनचें अस्तित्व हें अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणाला मूर्तिमंत आव्हान आहे अशी अमेरिकन राज्यकर्त्यांची बालंबाल खात्री होऊन चुकली आहे. कोरियन युद्धामधील शस्त्रसंधीच्या वाटाघाटीमुळें लोकसत्ताक चीनला जगांतील महान् राष्ट्राचा दर्जा प्राप्त झालेला आहे व जिनीव्हा-परिषद् यशस्वी झाल्यास तो दर्जा अधिकच वाढेल अशी त्यांना दहशत वाटत आहे. कारण मग चीनला संयुक्त-राष्ट्रसंघांत व सुरक्षा-समितींत स्थान देणें अटळ होणार हें निश्चित आहे. तसें झाल्यास अमेरिकेच्या आशियाबाबतच्या धोरणास फार मोठी ठोकर बसेल ह्यांत संशय नाहीं. जिनीव्हा-परिषद् भरण्यापूर्वी इण्डोचीनमधील युद्धाचा विस्तार वाढविण्याचा, व त्यांत ब्रिटनला व शक्य तर आशियामधील राष्ट्रांना गोंवून घेण्याचा अट्टहास अमेरिकेनें चालविलेला होता तो, हें अटळ भवितव्य चुकवितां यावें, येवढ्यासाठीं होय.

परंतु इण्डोचीनमधील युद्धांत शस्त्रसंधि घडवून आणण्याचें पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांनीं बड्या राष्ट्रांना केलेलें आवाहन व त्या आवाहनाचें आशियाई राष्ट्रांत व खुद्द ब्रिटनमध्यें झालेलें स्वागत, ह्यामुळें जिनीव्हा परिषद् उधळून लावण्याचा अमेरिकेचा

डाव फसला. आज तरी इण्डोचीनमधील युद्धांत शस्त्रसंधि घडून येईल अशी निश्चिति बाळगण्यासारखी परिस्थिति निर्माण झालेली आहे.

मात्र अशा रीतीनें इण्डोचीनमधील युद्धामधून जागतिक युद्धाचा भडका उडण्याचा तात्कालिक धोका टळला असला, तरी जें कोरियामधील व इण्डोचीनमधील युद्धांनीं साधलें नाहीं तें इतर मार्गांनीं घडवून आणण्याचें प्रयत्न अमेरिकेनें सोडून दिलेले नाहींत. इण्डोचीन सरहद्दीवरील आक्रमणाच्या संभवासंबंधीं सयामनें सुरक्षासमितीसमोर मांडलेली तक्रार, तेथें संयुक्तराष्ट्रसंघटनेचे निरीक्षक पाठविण्यांत यावेत अशी केलेली मागणी, व त्यांची तत्काल दखल घेण्यांत यावी म्हणून अमेरिकेनें सुरक्षासमितींत केलेला आटापिटा – ह्यांवरून लोकसत्ताक चीनच्या निर्दालनासाठीं आशियाखंडावर युद्धाचें अरिष्ट लादलें जाण्याचा धोका अजून पूर्णपणें टळलेला नाहीं. त्यासाठीं आशियाखंडामधील राष्ट्रांनीं एकजुटीनें व सावधगिरीनें शांततेच्या धोरणाचा सक्रिय पुरस्कार करणें आवश्यक आहे. भारताचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू व लोकसत्ताक चीनचे पंतप्रधान चाऊ-एन्-लाय ह्यांची दिल्ली येथें नुकतीच झालेली मुलाखत व त्या उभयतांनीं त्यांच्यांत झालेल्या वाटाघाटीसंबंधानें काढलेलें पत्रक ह्या नजीकच्या भवितव्याच्या दृष्टीनें निर्णायक घटना ठरतील ह्यांत संशय नाहीं.

व्हिएत्-मिन्ह लोकसत्तेचें वर्गीय स्वरूप, हो-चि-मिन्हच्या सरकारचा कार्यक्रम व रणधुमाळीच्या ह्या सात-आठ वर्षांच्या काळांत त्या सत्तेनें विधायक पुनर्रचनेच्या कार्यांत मिळविलें सुयश–ह्यांचा आढावा ह्या लेखाच्या विषयमर्यादा व स्थलमर्यादा लक्षांत घेतां शक्य नाहीं. पण तसा आढावा जर कोणी अभ्यासु वाचक घेईल तर व्हिएत्-मिन्हच्या यशाचें रहस्य भांडवलशाही, साम्राज्यशाही व त्यांच्या पोटीं जन्मलेला वसाहतवाद ह्यांच्यापेक्षां उच्चतर तत्त्व त्या पक्षाच्यापाशीं आहे ह्यांतच आहे असें त्यास निःसंशय दिसून येईल. त्या दृष्टीनें पहातां, लेखाच्या आरंभी जे सीनेटर जॉनसन यांचे उद्गार उद्धृत केले आहेत ते मननीय आहेत. कम्युनिस्ट तत्त्वप्रणालीच्या प्रामाणिक विरोधकांनीं त्या तत्त्वप्रणालीच्या पुरस्कर्त्यांकडून घडलेल्या अथवा घडणाऱ्या प्रमादावर लक्ष एकत्रित करून दुराग्रहवश न होता, त्या उद्गारांचा सावचितपणें विचार करण्याची वेळ खास आलेली आहे. तसें त्यांनीं केल्यास तत्त्वभिन्नता व साधनभिन्नता राहूनहि मानवजातीच्या सामुदायिक उन्नतीचा व विश्वशांतीचा मार्ग अधिक सुकर केल्याचें श्रेय त्यास लाभूं शकेल हा विचार येथें नम्रपणें नमूद करावासा वाटतो. ता. १०-७-५४

## माझ्या मनिंचें सोनपांखरूं !

माझ्या मनिंचें सोनपांखरूं
इवलें अचपळ नवथर द्युतिमय
चिंवचिंव करितें ' विहरिन ' म्हणतें,
' दिगंतराच्या घुमटावरतुन. '

माझ्या मनिंचें सोनपांखरूं
चिंवचिंव करितें ' वेढून ' म्हणतें
' क्षितिज-भालिंच्या सोनसळीला
चोंचित दुबळया हलकें प्राशुन ! '

चिंवचिंव करितें आणिक म्हणतें
' पंखांचीं ह्या शिडें उभारून
नभोनीलिमा अथांग लंघुन
पैलथडीच्या परात्पराला
सहज एकदां येइन चुंबुन ! '
— परी तयाचा हाय ! जटायु
मींच करावा रावण होउन !
मींच करावा रावण होउन !

— मधु वाबगांवकर

## आपुलाच दाम खोटा !

क्षितिजाला धरूं पाहे
जरतारी मृगजळ
मन कवेंत आणाया
बुद्धीचीहि धांवपळ
वेळेवरी नाचताती
निळया सागराच्या लाटा
अंतरांत कल्पनेला
दहा दिशा, दहा वाटा
इन्द्रचापांतले रंग
पिंजुनिया आशावली
दंग मनोरथांसवें
ऊन-पावसाच्या खेळीं
कातळाचा शाळिग्राम
होय, झेपावतां लाटा
नाहीं आकार जीवना
आपुलाच दाम खोटा !

——गणेश पाठक







श्री. ' अर्थव्यासंगी '

# कडू चॉकलेट व अगोड कोको

शॉच्या ' हार्टब्रेक हाऊस ' या नाटकांतील अेक यशस्वी कारखानदार आपल्या यशाचें रहस्य असें सांगतो : " मी नवे उद्योगधंदे सुरू करीत नाहीं. मात्र दुसऱ्यांनीं सुरू केलेल्या नव्या धंद्यावर माझें लक्ष असतें. ही उत्साही मंडळी आपले व मित्रांचे पैसे नव्या धंद्यांत गुंतवितात. अपार श्रम व हाल सोसून धंदा यशस्वी करतात. पण पैशाच्या जगांत हीं माणसें कच्चीं असल्यामुळें लवकरच आर्थिक अडचणींत सांपडतात व सुरू केलेला नवा धंदा दुसऱ्यास चालविण्यास देण्यास तयार होतात. मी पुढें सरसावून अगदी स्वस्तांत हा धंदा हस्तगत करतों आणि जगांत यशस्वी ठरतों."– ही कर्तबगारी नाट्यपूर्ण असली तरी व्यवहारी जगांतील ती अेक कटु सत्य आहे असा वारंवार अनुभव येतो. आपल्या देशांत खुद्द हिंदुस्थानसरकारच्या मदतीनें परदेशी कारखानदार वरील नाट्याचा प्रयोग करीत आहेत, ही गोष्ट फार थोड्या लोकांच्या लक्षांत येते. कारण ह्या सर्व हालचाली पडद्यामागें होत असतात.

युद्धकालांतील परिस्थतींत परकीय चढाओढीपासून सहजच संरक्षण मिळाल्यामुळें आपल्या देशांत अनेक उद्योगधंदे नव्यानें स्थापन झाले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या नव्या प्रयत्नांचे रोप राष्ट्रीय सरकारच्या मदतीनें चांगलेंच फोफावेल अशी साहजिकच अपेक्षा होती. पण स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळांतील सरकारी औद्योगिक धोरणाचा परिणाम असा झालेला दिसतो कीं सरकारी मदतीनें प्रगति तर राहोच पण नवे उभारलेले धंदे अन्याय्य चढाओढीमुळें विसर्जन तर करावे लागणार नाहींत ना अशी भीति वाटावी अशी आज दुरवस्था उत्पन्न झाली आहे ! या लेखांत युद्धकालांत प्रथमच सुरू झालेल्या एका छोट्या उद्योगधंद्याची सरकारी धोरणानें कशी चिंतनीय परिस्थिति झाली आहे ही गोष्ट किंचित् विस्तारानें मांडली आहे.

अन्याय झालेला उद्योगधंदा राष्ट्रीय दृष्टीनें लहान आहे. असा धंदा बंद पडला तरी सरकारदप्तरीं फारसें दुःख होईल असें नाहीं. पण या छोट्या उदाहरणावरून नव्या कारखानदारीवर सरकारी धोरणाचे कसे निष्ठुर आघात होतात हें स्पष्ट होईल. हें एक उदाहरण आहे. याच स्थितींत देशांतील अनेक लहानमोठे धंदे आहेत आणि त्यामुळें यावरून निघणारा बोध अधिक व्यापक क्षेत्रास लागू आहे ही गोष्ट मात्र निश्चित.

युद्धकालांत आपल्या देशांत प्रथमच कोको व चॉकलेट्‌ या पदार्थांची कच्च्या मालापासून निर्मिति होऊं लागली. कोको व चॉकलेट्स यांच्या उत्पादनास लागणारा मुख्य कच्चा माल म्हणजे कोको-बिया. कोको-बिया आकारानें शेंगदाण्यापेक्षां मोठ्या व रंगानें तशाच असतात. या बिया प्रथम स्वच्छ करून भाजण्यांत येतात व त्यानंतर टरफल दूर करून त्यांची भरड करण्यांत येते. ही भरड अनेक जात्यांच्या पाण्यांतून दळल्यावर मलईसारखी रवडी ( चॉकलेट-पेस्ट ) तयार होते. ही रवडी चांगली घोटून सांच्यांत घालून थंड जागेंत ठेवण्यांत येते. कांहीं वेळानें रवडीच्या घट्ट वड्या होतात व ह्या वड्या म्हणजे अगोड चॉकलेट. चॉकलेट-रवडींत साखर, खवा अित्यादि पदार्थ मिसळून गोड, दुधाचें असे अनेक प्रकारचे चॉकलेट तयार होतें. कोको–बियांत कोको-बटर ( तेल ) नांवाचा एक स्निग्ध पदार्थ असतो. बियांच्या रवडींतून यंत्रांच्या साहाय्यानें कोको-बटर काढून घेतल्यावर कोको-पेंड तयार होते. ही पेंड बारीक दळल्यावर कोको-पावडर तयार होते. या कोको-पावडरपासून कोको पेय तयार करण्यांत येतें.

कोको-बिया हिंदुस्थानांत तयार होत नाहींत कारण बियांच्या लागवडीस विशिष्ट हवामान लागतें. ब्राझील, वेस्ट ऑफ्रिका, सीलोन या वसाहती व निमवसाहती देशांत कोकोच्या झाडांच्या मोठ्या लागवडी असून त्यांच्या बियांपासून कोको, चॉकलेट्स व हरेक प्रकारची मिठाई करण्याची मक्तेदारी इंग्लंड, अमेरिका व युरोपीय राष्ट्रांची आहे. युद्धकालांत सिलोनहून कोको-बिया







आणून यंत्रसामग्रीच्या साहाय्यानें कोको व चॉकलेट्स तयार करण्यास सुरवात आपल्या देशांत १९४१ मध्यें पुण्याचे बिस्किट-कारखानदार साठे-बंधू यानीं केली. चॉकलेट व कोकोधंद्यास संरक्षण द्यावें किंवा नाहीं या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं आतापर्यंत नेमलेल्या सर्व सरकारी समित्यांनीं साठे-बंधू यांच्या कारखान्याचा प्रामुख्यानें उल्लेख केलेला असून त्यांचा कारखाना हिंदुस्थानांतील मोठ्या प्रमाणावर कोको व चॉकलेट्स सतत निर्माण करणारा एकमेव कारखाना आहे असा अभिप्राय व्यक्त केला आहे. साठे-बंधू यांचा कारखाना १९४९ पासून 'साठे बिस्किट ॲण्ड चॉकोलेट कंपनी लिमिटेड' या समाइक भागिदारीच्या संस्थे-मार्फत चालविण्यांत येत असून, त्यांतील चॉकलेट विभागांत १५ ते १८ लक्ष रुपयांचें भांडवल गुंतलेलें आहे.

कोको व चॉकलेट धंद्यास संरक्षण देण्याच्या प्रश्नाबाबत आजपर्यंत तीन समित्यांनीं (टॅरिफ कमिशननीं) विचार केला आहे. त्यांपैकीं १९४६ व १९४९ च्या चौकशीचे अहवाल प्रसिद्ध झाले असून धंद्यास जरूर तें संरक्षण देण्यांत आलें आहे. १९५४ च्या चौकशी-समितीचा अहवाल अद्याप प्रसिद्ध व्हावयाचा आहे. १९५४ च्या चौकशीच्या वेळीं अध्यक्षीय भाषणांत श्री. बी. एन्. आडारकर यांनीं या धंद्याच्या प्रगतीचा आढावा घेऊन असें सांगितलें कीं साठे-कंपनीचें उत्पादनसामर्थ्य व प्रत्यक्ष उत्पादन यांत फार मोठी तफावत असून देशांत चालू केलेल्या यंत्रांना भरपूर काम कसें द्यावें हाच या धंद्यापुढील महत्त्वाचा प्रश्न आहे. अशा परिस्थितींत एका नव्या ब्रिटिश कारखान्यास सरकारनें चॉकलेट्स व कोको निर्माण करण्यासाठीं कारखाना काढण्यास परवानगी द्यावी, इतकेंच नव्हें तर अनेक सवलती द्याव्या ही गोष्ट आश्चर्यकारक आहे. या परदेशी कारखान्याच्या स्थापनेचा इतिहास मोठा मनोरंजक व सरकारी औद्योगिक धोरणाच्या एका कच्च्या दुव्यावर भरपूर प्रकाश टाकणारा असा आहे.

देशांतील एकमेव कारखान्याची परिस्थिति अपुऱ्या मागणीमुळें असमाधानकारक असतां जगांतील मोठी बाजारपेठ काबीज केलेल्या एका परदेशी कारखान्यास 'कॅडबरी फ्राय' यास — हिंदुस्थानांत कारखाना काढण्यासाठीं खास सवलती मिळाव्या ही गोष्ट असंभवनीय वाटते. दिल्लीच्या लोकसभेंत दिनांक १८-११-५३ ला या प्रश्नावर महत्त्वाची चर्चा झाली. लोकसभेचे एक सभासद श्री. नंबीयार यांनीं कॅडबरी कंपनीस दिलेल्या परवानगीबद्दल कांहीं महत्त्वाचे प्रश्न उपस्थित केले ते असे :

१ कॅडबरी फ्राय कंपनीचा कारखाना कोठें निघणार ? त्या कारखान्यांत कोको व चॉकलेट्सचें उत्पादन किती होईल ?

२ कारखान्यांत हिंदी भांडवल वा संचालकमंडळांत हिंदी गृहस्थ आहेत काय ?

३ कारखान्यास परवानगी देण्यापूर्वीं सरकारनें देशी कारखानदारांचा सल्ला घेतला होता काय ?

४ कारखान्यास कोणत्या अटींवर परवानगी देण्यांत आली आहे ?

वरील प्रश्नांचीं उत्तरें व्यापार-व-उद्योगमंत्री श्री. टी. टी. कृष्णम्माचारी यांनीं दिलीं तीं अशीं:—

(१) कॅडबरी-कंपनीस कारखाना काढण्याची परवानगी १९४८ साली देण्यांत आली असून हा कारखाना मुंबईस सुरू झाला आहे. १९५२ पर्यंत चॉकलेटच्या वड्या करणें, कोको डब्यांत भरणें वगैरें कार्य कंपनी करीत होती. यंत्रसामग्री आल्यावर कोको-बियांपासून ४५० टन चॉकलेट व २५० टन कोकोपावडर कंपनीच्या कारखान्यांत तयार होईल.

(२) कंपनीचें अधिकृत भांडवल रु. २०,००,००० असून त्यापैकीं ३५·६ टक्के भांडवल हिंदी आहे. संचालकमंडळाच्या नांवाच्या यादीवरून संचालकमंडळांत श्री. टी. टी. नरसिंहन् हे एकमेव हिंदी संचालक आहेत.

( श्री. टी. टी. नरसिंहन् हे मद्रासच्या टी. टी. कृष्णमाचारी आणि कंपनी या आयात व निर्यात करणाऱ्या संस्थेचे एक संचालक असून मंत्रिमहाशयांचे हे चिरंजीव आहेत. )

(३) चॉकोलेट व कोकोचा धंदा उद्योगधंद्यांचें (नियमन करणाऱ्या ) कायद्याखालीं येत नसल्यामुळें, सरकारी अधिकाऱ्यांच्या समितीनें त्यांच्या अर्जाचा विचार करून परवानगी दिली. देशी कारखानदार अशा नव्या कारखान्याच्या स्थापनेबद्दल जागरूक असतात, म्हणून त्यांचा खास सल्ला घेतला नाहीं. सल्ला घेण्यापूर्वीच ते तक्रार करूं शकतात.

(४) इण्डस्ट्रीज रेग्युलेशन कायद्याखालीं हा उद्योगधंदा येत नसल्यामुळें त्यावर खास अशा अटी लादल्या








नाहींत. सरकारी अधिकाऱ्यांच्या समितीकडून कंपनीला जरूर मदत मिळते. '१९५२ पर्यंत यंत्रें आणून कारखाना उभारूं' असें कंपनीनें कबूल केलें आहे.

वरील उत्तरांचा अर्थ इतकाच कीं सरकारी अधिकाऱ्यांच्या मर्जीनुरूप नव्या कारखान्यास परवानगी मिळाली व कारखान्याच्या मागणीप्रमाणें त्यांना १९४८ पासून जरूर त्या सवलती वेळोंवेळीं देण्यांत आल्या. वरील उत्तरांचा अधिक विस्तारानें विचार केल्यास, सरकारी धोरणाचा उपयोग परदेशी कंपन्या आपल्या फायद्यासाठीं कसा करून घेतात यावर स्पष्ट प्रकाश पडेल.

कॅडबरी कंपनीचें चॉकलेट धंद्यांत विशिष्ट स्थान आहे. जगांतील मोठी व्यापारपेठ कंपनीच्या कक्षेंत असून कंपनीच्या संलग्न संस्था वसाहती देशांत आहेत. जागतिक व्यापाराचा व उत्पादनाचा मक्ता आपल्याकडे शक्य तों रहावा हें धोरण कंपनी कसोशीनें चालविते. या दृष्टीनें १९५३ मध्यें कॅडबरी-कंपनीनें पुरस्कृत केलेली एक पुस्तिका – 'कोको: उज्ज्वल भवितव्याचें पीक' ('Cocoa: a Crop with a future') महत्त्वाची आहे. ह्या पुस्तिकेंतील विवेचनाचा सर्व भर वसाहती व तत्सम देशांत होणाऱ्या कोको-बियांच्या लागवडीच्या महत्त्वावर आहे. या पिकांकडे अधिक लक्ष पुरविणें जरूर आहे इतकेंच नव्हे तर मलायासारख्या वसाहती देशांत या पिकाची लागवड करणें त्या देशाच्या शेतकीच्या स्थैर्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे, असा निष्कर्ष त्या पुस्तिकेंत काढला आहे. या विवेचनांत वसाहती देशांतील कोको-बियांचा उपयोग त्या देशांतच उद्योगधंदे काढून अधिक उत्तम तऱ्हेनें करतां येईल हा विचारसुद्धा पुस्तिकेच्या लेखकाला आलेला नाहीं. वसाहती देशांनीं उत्तम पीक काढून त्यापासून पक्का माल युरोपीय देशांनीं करावा हा जो जुना विचार त्याचा उच्चार मात्र येथें केलेला नाहीं. याचें कारण सुद्धा उघड आहे. कारण, लंडनमध्यें १९४८ मध्यें कोको-बियांची किंमत एका हंड्रेडवेटला सुमारें १९५ शिलिंग होती, तर त्यापासून तयार झालेल्या पक्क्या मालाची किंमत सरासरी ३०५ शिलिंग इतकी होती. कच्च्या मालापासून पक्क्या वस्तू करून मिळणारा फायदा वसाहती देशास देण्याचा उदारपणा इंग्रजी कंपनीस सुचण्याचें कारण नाहीं – आपल्या भारतदेशांत एका जागतिक मक्तेदार संस्थेस तोंड देण्याचा प्रयत्न व्हावा ही खरोखर अभिमानाची गोष्ट आहे. पण कॅडबरी कंपनीला परवानगी देतांना हा स्वदेशीचा विचारच झालेला दिसत नाहीं.

देशांतील चॉकलेट व कोकोची मागणी लक्षांत घेतां आणखी नवा कारखाना काढून त्यांत अकारण भांडवल गुंतविण्याची गरज नाहीं असा सल्ला सरकारनें कॅडबरी – कंपनीस द्यावयास हवा होता. देशांतील कोको व चॉकोलेटच्या मागणीचा सरकारी अंदाज व प्रत्यक्षांतील पुरवठा यांची तुलना केल्यास सरकारी मागणीचे आंकडे अवास्तव वाटतात. कदाचित् कॅडबरी कंपनीस कारखाना काढण्याच्या दिलेल्या परवानगीची तरफदारी करतां यावी म्हणून १९५४ च्या टॅरिफसमितीकडे व्यापार-व-उद्योगधंद्याच्या खात्याकडून अंदाजी मागणीचा वार्षिक आंकडा एक हजार टन असा आला असावा. १९४६ च्या समितीनें अंदाजी वार्षिक मागणी १००० टन, १९४९ च्या समितीनें अंदाजी मागणी ७५० टन व वर उल्लेख केलेला चालू अंदाज १००० टन असे अधिकृत आंकडे आहेत. आतां खालीं दिलेले देशांतील पुरवठ्याचे आंकडे (पुरवठा = उत्पादन अधिक आयात वजा निर्यात) वरील अंदाजी मागणी अवास्तव आहे असें दाखवितात.

**चॉकलेट व कोको पुरवठा**

| | |
|---|---|
| १९५० | २३०·१ टन |
| १९५१ | ४३८·८ टन |
| १९५२ | ३४६·५ टन |

वरील आंकड्यांची छाननी करून १९५४ च्या टॅरिफ-कमिशननें अंदाजी मागणी ५०० टनापेक्षां अधिक असूं नये असा अभिप्राय दाखल केला आहे. साठे-कंपनीची वार्षिक उत्पादनशक्ति १९५० सालापासून ६०० टनाइतकी आहे. आणि कॅडबरीचा कारखाना निघाला तर देशांतील उत्पादनशक्ति १३०० टनाइतकी होईल. वरील पुरवठ्याचे आंकडे पाहून मागणीची शक्यता अजमावल्यास एवढ्या मोठ्या उत्पादनशक्तीची देशाला गरज नाहीं हें सहज लक्षांत येईल. खुद्द हिंदसरकारनें या परिस्थितीची दखल घेऊन एका देशी कारखानदारास स्विस चॉकलेट कंपनीच्या मदतीनें चॉकलेटचा कारखाना काढण्याची परवानगी नाकारली अशी माहिती टॅरिफ कमिशनपुढें








एका साक्षींत सांगण्यांत आली.

चौकशी न करतां परवानगी सरकारी अधिकाऱ्यांच्या मसलतीनें दिली, त्यांत जबाबदार मंत्र्यांचा फारसा भाग नाहीं असा युक्तिवाद जरी मान्य केला, तरी आज कॅडबरी-कंपनीस कारखाना काढण्याची परवानगी मिळून सहा वर्षे होत आली तरी अद्याप टॅरिफ-कमिशनपुढें आलेल्या माहितीवरून कॅडबरी-कंपनीचा कारखाना अद्याप सुरू झालेला नाहीं, – यंत्रें अद्याप आलेलीं नाहींत अगर आणण्याची पण व्यवस्था झालेली दिसत नाहीं. हें जर सत्य असेल तर कॅडबरीच्या भारतांतील कारखान्यांत (?) कोणतें काम होतें ? – याचें उत्तर असें देतां येईल कीं परदेशांतून तयार चॉकलेट आणून येथें लहान वड्या तयार करून वेष्टनांत गुंडाळण्यांत येतात व तो तयार झालेला माल ' हिंदुस्थानांत बनविलेला ' म्हणून विकण्यांत येतो. वरील युक्तींत कॅडबरी-कंपनीचा फायदा असा कीं उत्पादनाचा खर्च न करतां जकातीच्या दराच्या सवलतीचा फायदा घेऊन ते जरूर तो पक्का माल बाहेरून आणूं शकतात. (चॉकलेट कच्चा माल अशा स्वरूपांत आल्यास त्यावर ३० टक्के इतकी आयात जकात आहे. मात्र छोट्या तयार चॉकलेटवर ६५ टक्के इतकी जकात आहे).

कॅडबरी-कंपनीचे जगभर सुसज्ज कारखाने असल्यामुळें येथें कारखाना उभारण्याची यातायात न करतां फक्त छोट्या वड्या तयार करण्याचें काम करून फायदा उठवावा असें कंपनीचें व्यापारी धोरण आहे. अशा कारखानदारीनें सरकारी परवान्याचा दुरुपयोग होतो अशी तक्रार सरकारकडे करण्यांत आली असतां, असें उत्तर देण्यांत आलें कीं आयात धोरणाचा व वरील प्रमाणें मालाची आयात करण्याची कॅडबरी-कंपनीस दिलेली परवानगी यांचा संबंध नाहीं. कॅडबरी-कंपनीमार्फत होणारी आयात प्रयोगासाठीं व त्यांना दिलेल्या कराराप्रमाणें आहे. जुलै ते डिसेंबर १९५३ या मुदतींतील आयात-धोरणाप्रमाणें फक्त स्वतःच्या उपयोगासाठीं चॉक्लेट्स आयात करण्याची परवानगी होती. पण या धोरणाविरुद्ध कॅडबरी-कंपनीस फेरविक्रीसाठीं १२ लक्ष रुपयांचें चॉकलेट आयात करण्याची परवानगी मिळाली. ही सवलत त्यांच्या कराराप्रमाणें मिळाली हें सरकारी म्हणणें खरें असेल तर कराराप्रमाणें गेल्या सहा वर्षांत यंत्रसामग्री न उभारल्याबद्दल कॅडबरी-कंपनीला सरकारनें कांहींच जाब विचारलेला दिसत नाहीं. चॉकलेटसारखा कारखाना उभारण्यास या जगद्विख्यात कंपनीस सहावर्षांइतका कालावधि लागावा ही गोष्ट सरकारनें विचारांत घ्यावयास हवी होती. कदाचित् ह्या बाबतींतहि कंपनीनें अधिकाऱ्यांच्या समितीची समजूत घातली असावी.

यापुढील प्रश्न भांडवलाबद्दलचा आहे. सरकारी आंकडेवारीप्रमाणें कॅडबरी-कंपनींत ३५.६ टक्के इतके भांडवल देशी आहे. मुंबईच्या रजिस्ट्रार ऑफ् कंपनीज कडे (-जेथें ही कंपनी नोंदविण्यांत आली आहे-) दाखल झालेल्या माहितीप्रमाणें कंपनीच्या रु. २० लक्ष अधिकृत भांडवलापैकीं जमा भाग रुपये १२,९६१०० असून पैकीं रु. १०० चा एक शेअर श्री. टी. टी. नरसिंहन यांचा आहे. अर्थात् या आंकडेवारीवरून हिंदी भांडवल ३५.६ टक्के आहे असें म्हणता येणार नाहीं. कदाचित् सरकारी दप्तरांतील माहिती अधिक अद्ययावत् असेल. लोकसभेंतील दिलेली ही आंकडेवारी असमाधानकारक असल्यामुळें सरकारी उत्तराच्या अधिकृतपणाबद्दल संशय उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. कारण, दोन सरकारी आंकडे यांचा मेळ बसत नाहीं. लोकांकडून कररूपानें जमा होणाऱ्या पैशापैकीं कांहीं भाग सरकारी उत्तरें तयार करण्यांत खर्च होत असल्यामुळें सरकारी आंकडेवारी निर्दोष असावी अशी अपेक्षा साहजिक आहे. ही आंकडेवारी बरोबर असो वा नसो, एक गोष्ट स्पष्ट होते ती म्हणजे कॅडबरी-कंपनींतील हिंदी भांडवल नाममात्र आहे. अर्थात् या कारखान्याचें स्वरूपच व्यापारी संस्थेचें असल्यामुळें हिंदी भांडवलाच्या प्रश्नाचा अधिक विचार करण्याचें कारण नाहीं. हिंदी संचालकाच्या बद्दल अधिक लिहिणें प्रस्तुत होणार नाहीं. त्यांचें व्यापार व उद्योग मंत्र्यांचें नातें हा एक योगायोगाचा भाग आहे असें म्हणावें एवढेंच. लोकशाही राज्यांत असे योगायोग फारसे उचित आहेत असें कोणी म्हणणार नाहीं.

कॅडबरी-कंपनीस कारखाना काढण्यास दिलेल्या परवानगीच्या चौकशीबाबत जो खुलासा सरकारतर्फे करण्यांत आला तो मात्र सरकारी धोरणांतील एक अत्यंत कच्चा दुवा आहे. एक तर ज्या कायद्यान्वयें नव्या उद्योगधंद्यांची स्थापनेपूर्वी चौकशी होते व चौकशी पुरी झाल्यावर स्थापनेची परवानगी मिळते,








त्या कायद्याच्या कक्षेंत सदर उद्योगधंदा येत नाहीं. म्हणून सरकारी अधिकारी आपल्या अधिकारांत परवानगी देऊं शकत असतील तर ही परिस्थिति अत्यंत असमाधानकारक होय. नव्या उद्योगधंद्यांच्या नियंत्रणाचा व नोंदणीचा कायदा नवा आहे. या कायद्याच्या कक्षेंत ३७ धंद्यांच्या स्थापनेसाठीं नियोजन केलें आहे. या नियोजनासाठीं निवडलेले धंदे कसे निवडले याचा उलगडा होत नाहीं. यांत नवे जुने असे अनेक असंबद्ध धंदे आहेत. तेव्हां एखादा उद्योगधंदा वरील कायद्याच्या कक्षेंत येत नाहीं म्हणून त्याबद्दलचा निर्णय सरकारी अधिकाऱ्यावर सोंपविण्याची जबाबदारी फार विचारानें ठरवावी लागेल. सध्यां दिल्लीला एका बड्या सरकारी अधिकाऱ्याची जी न्यायालयीन चौकशी चालू आहे ती पहातां गरजू व्यक्तींना अधिकाऱ्यांना आमिषानें वश करणें शक्य असतें असें अनुमान काढण्यास हरकत दिसत नाहीं. तेव्हां अधिकाऱ्यांच्या अनिर्बंध निर्णयावर देशांतील एका नव्या धंद्याचें भवितव्य सोंपविणें किती धोक्याचें आहे याची कल्पना येईल.

ब्रिटिश राजवटींत एक काळ असा होता कीं, हिंदुस्थानांतील राजसत्तेकडून होणारा अन्याय वास्तविक नोकरशाहीचा प्रताप आहे, उदारमतवादी इंग्रजांना त्या अन्यायाची कल्पना नसते अशी समजूत काढण्याची वर्तमानपत्रांची पद्धत होती. आज स्वातंत्र्यानंतरहि लोकनियुक्त मंत्री नोकरशाहीच्या हातीं महत्त्वाचे निर्णय सोंपवून स्वस्थ बसले तर आजचे राज्यकर्ते कोण ? नोकरशाही कीं लोकनियुक्त मंत्रि-मंडळ ? — असा प्रश्न निर्माण होणें शक्य आहे. ब्रिटिश राजवटींतील नोकरशाहीची घडण निराळ्या ध्येयासाठीं — ब्रिटिश राज्यसत्ता कायम ठेवण्यासाठीं होती. त्या पद्धतीच्या नोकरशाहींत — रचनेंत व ध्येयांत आतां फरक केल्याशिवाय समाजकल्याणाची धुरा वाहणारें सरकार प्रत्यक्षांत येणें अशक्य आहे. आपल्या देशाच्या आर्थिक विकासाची गति जलद करावयाची असेल तर नोकरशाहीच्या चौकटींत खूपच फेरबदल करावे लागतील अशी सूचना 'गोखले अर्थशास्त्रसंशोधनसंस्थे'च्या तर्फे अलीकडे झालेल्या व्याख्यानांत श्री. वा. रा. नातू यांनीं केली आहे, ती या संदर्भांत अत्यंत महत्त्वाची आहे.

वरील विवेचनावरून भारतसरकारच्या धोरणानें एका विदेशी मक्तेदार-कंपनीस आपलें आसन देशांत स्थिर करण्यास कशी मदत झाली आहे याची कल्पना येईल. भारतांत परदेशी कंपन्याच नसाव्यात असा याचा अर्थ नाहीं. भारत-सरकारचें असें म्हणणें आहे कीं देशांतील कारखान्यांत तयार होणाऱ्या वस्तूंची प्रत सुधारावयाची असेल तर सुसज्ज व अधिक अनुभव असलेल्या परदेशी कार्यक्षम संस्थांची चढाओढ जरूर आहे; अशी चढाओढ नसेल तर देशांतील बाजारपेठांची मक्तेदारी मिळून देशी कारखानदार स्वतःच्या फायद्यासाठीं सवलतीचा दुरुपयोग करतील. ही विचारसरणी जरी मान्य केली तरी परदेशी धंद्यांना देशी धंद्यांपेक्षा अधिक सवलती मिळाव्या असा सरकारी धोरणाचा अर्थ होऊं नये. कॅडबरी-कंपनीला मिळालेल्या सवलतींचें स्वरूप असें आहे कीं त्या बळावर व कॅडबरीच्या जागतिक लौकिकावर ती कंपनी देशी कारखानदारी नष्ट करूं शकेल. भारतांत परदेशांतून जकात चुकवून आणलेला पक्का माल येथें फक्त वेष्टण चढवून विकण्याचें कार्य— याला न्याय्य चढाओढीची कारखानदारी म्हणतां येणार नाहीं. साठे-कंपनीच्या चॉकलेट्स व कोकोच्या प्रतीबद्दल म्हैसूरच्या अन्न-संशोधन-प्रयोगशाळेचा उत्तम अभिप्राय असून मालाचा दर्जा आयात मालाइतका उत्तम आहे असा त्यांचा अहवाल दाखल झाला आहे. यावरून देशी कारखानदार मालाच्या प्रतीबद्दल जागरूक नसतात असें म्हणतां येणार नाहीं.

वरील विवेचनावर असा आक्षेप येईल कीं ज्या धंद्यावर अन्याय झाला त्याचें स्वरूप इतकें लहान आहे कीं त्यामुळें देशांतील कारखानदारीच्या वाढीस खीळ बसणार नाहीं. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. कारण, चॉकलेटप्रमाणें टाईपरायटर्स, झरणीची शाई, साबण वगैरे अनेक नव्या धंद्यांवर परदेशी कंपन्या सरकारी मदतीनें अयोग्य आक्रमण करीत आहेत. एका देशी कारखानदारानें आणविलेली टाईपरायटर्स बनविण्याची यंत्रसामग्री, सरकारनें एका जगद्विख्यात संस्थेस देशांत कारखाना काढण्याची परवानगी दिली म्हणून, तशीच ठेवून दिली आहे. त्या विचाराचा उद्देश हा कीं झालेला तोटा पुरे— धंदा सुरूं करून पुन्हां खोट नको ! पेन-शाईच्या पार्कर कंपनीच्या शाईच्या कारखान्याची ( —विक्रेते टी. टी. कृष्णम्माचारी आणि कंपनी—) गोष्ट अशाच प्रकारची आहे.







नोकरशाहीच्या मदतीनें परदेशी कारखानदार देशी कारखान्यावर अशी कुरघोडी करणार असतील तर सरकारनें अधिक दक्षता दाखविणें जरूर आहे. देशी धंद्यांना औद्योगिक धोरणामुळें अधिक न्याय नसला तरी अन्याय होणार नाहीं याची खात्री जनतेला जबाबदार असणाऱ्या सरकारनें देणें जरूर आहे. या लेखाचा रोख विशिष्ट मंत्री, त्यांचे आप्त अगर अधिकारी यांचेवर नसून ज्या पद्धतीनें देशाच्या औद्योगिक धोरणाची अंमलबजावणी होत आहे त्यावर आहे. 'नवभारत'च्या जूनच्या अंकांत श्री. का. शि. पाटील – ('भारताची औद्योगिक प्रगति' – पृष्ठ '५९–'९८ ) यांनीं सरकारच्या औद्योगिक धोरणाबद्दल कारखानदार फारसे उत्साही नाहींत असा उल्लेख केला आहे. भारतांतील कारखानदार उत्साही कां नाहींत याची एक कारणमीमांसा या लेखांत सविस्तर केली आहे. भारताच्या औद्योगीकरणाबद्दल आस्था बाळगणाऱ्या सर्वांनीं सरकारचा औद्योगीकरणावर भर आहे अशा भरवंशावर स्वस्थ राहून चालणार नाहीं. औद्योगिक धोरणाचीं घोषवाक्यें सरकार प्रत्यक्षांत कशीं आणते यावरच देशांतील कारखानदारांचा व जनतेचा सरकारला पाठिंबा मिळेल.

## आतां – !

घरतीच्या गात्रांतुनि आतां
पुलक बहरतिल हिरवे नवथर
फुटेल हांसूं प्रसन्नतेचें
दिग्ललनांच्या मुखामुखावर
निळसर धूसर गगनपटावर
सजल घनांची उठेल नक्षी
क्षितिजाची ओलांडित रेषा
'न्हा – पेर्ते न्हा –' गाइल पक्षी
मातीमधल्या क्षुद्रकिड्यांना
नवेच आतां येतिल पंख
पेरित बसतिल नव्याच आशा
घरांघरांतुन उघडे रंक
दूर पसरल्या काळीवरती
हंसतिल फिरुनी हिरव्या रेषा
त्यांतच फुलतिल मूक मनींच्या
जळल्या सुकल्या अपुऱ्या आशा !

– बाबा मोहोड

## पुस्तक-परामर्श

**'पाप्युलेशन क्रायसिस इन इंडिया––'** (इंग्रजी) लेखकः **प्रा. वसंतकुमार पेठे व डॉ. वसुंधरा गांधी,** प्रकाशकः सुरस-ग्रंथमाला, सोलापूर, ( १९५४ ). पानें ४६, किंमत २–८–०

आपल्या देशांत लोकसंख्येच्या वाढीची समस्या विचारवंतासमोर उभी आहे. दर वर्षाला ४० लाखांनीं होणारी बेसुमार वाढ राष्ट्राला तारक न होतां मारक ठरणारी आहे ह्या अर्थशास्त्रीय सिद्धांताकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. ही जाणीव उशिरानें कां होईना सरकारला झाली ह्यांत संदेह नाहीं. सभा-संमेलनें, सामाजिक संघटना, वैद्यकीय परिषदा यांमध्यें या प्रश्नाची चर्चा होऊं लागली आहे व कुटुंबनियोजनासंबंधीं ठराव पास केले जात आहेत. एक काळ असा होता कीं त्या वेळेला संततिनियमनाचा विषय अश्लील समजला जात होता. आज ती स्थिति पालटली आहे आणि कुटुंबनियोजनाचा विषय लोकमान्य व सरकारमान्य झाला आहे. प्रतिगामी विचारांचे लोक सोडून दिले तर विचारी माणसांना कुटुंबनियोजनाची आवश्यकता पटूं लागली आहे असें म्हणावयाला प्रत्यवाय नाहीं. पण शिक्षित वर्गापुरतीच ही चळवळ मर्यादित न ठेवतां तिची जरूरी बहुसंख्य जनतेला पटवून देण्याची आवश्यकता आहे. कारण जनता ह्या विचारापासून अलिप्त राहील तर चळवळीचें उद्दिष्ट साध्य होणार नाहीं. त्या दृष्टीनें स्थानिक भाषांतून ह्या विषयाची चर्चा करणारीं पुस्तकें प्रसिद्ध व्हावयाला पाहिजेत. प्रा. पेठे ह्यांचें पुस्तक मराठींत असतें तर संततिनियमनाबद्दल जे विचार त्यांनीं मांडले आहेत ते जास्त लोकांसमोर आले असते. पण पुस्तक इंग्रजींत असलें तरी लेखकद्वयांनीं ज्या साधनांचा पुरस्कार हिरीरीनें केला आहे त्याबद्दल साधक-बाधक विचारविनिमय होणें जरूर वाटतें. शेचाळीस पानांच्या पुस्तिकेंत लेखकांनीं लोकसंख्येच्या वाढीचा प्रश्न साधक-बाधक दृष्टीनें विवेचिला आहे व ही वाढ कोणत्या उपायांनीं थांबविली पाहिजे त्याचाहि विस्तारानें विचार केला आहे. वाढती लोकसंख्या, राहणीचें मान कमी, अज्ञान आणि दारिद्र्य, लोकसंख्येंत अधिक वाढ – अशा ह्या दुष्ट चक्रांतून बाहेर पडण्याच्या दृष्टीनें जालीम उपाययोजना व्हावयाला पाहिजे असा त्यांचा निष्कर्ष आहे. सरकारी यंत्रणा या बाबतींत













अनुक्रमणिका

फार हळूं हळूं पावलें टाकते हा त्यांचा आरोप पुष्कळ अंशानें खरा आहे. संततिनियमनाच्या साधनांचा विचार करतां रबरपेसरी, कान्डोम अगर तत्सम साधनांपेक्षां लेखकांचा भर जननाक्षमतेची शस्त्रक्रिया व गर्भपात यांवर आहे तीन मुलें झाल्यानंतर प्रत्येक जोडप्यानें प्रजोत्पादन थांबविलेंच पाहिजे असा त्यांचा कटाक्ष आहे. तीन मुलांच्या जन्मानंतर जोडप्यापैकीं एकानें तरी जननाक्षमतेची शस्त्रक्रिया करून घेतली पाहिजे, नाहींतर कायद्यानें त्याच्यावर लादली पाहिजे असें त्यांनीं सुचविलें आहे. तीनापेक्षां जास्त मुलें उत्पन्न करणाऱ्या जोडप्यावर जादा कर लादावा व कमी मुलांना जन्म देतील त्या जोडप्यांना पारितोषिकें देण्यांत यावीं असें त्यांनीं सुचविलें आहे. गर्भपाताला कायदेशीरपणा देऊन उघड रीतीनें व सुधारलेल्या शस्त्रक्रियेची मदत घेऊन स्त्रीला गर्भपात करवून घेण्याची सोय असावी हा विचारहि त्यांनीं मांडला आहे.

पेसरी-आदीकरून साधनें शंभर टक्के गुणकारी नाहींत हें खरें. पण कटाक्षानें त्यांचा वापर केला तर पुष्कळ हिश्शानें संततीचें नियमन होऊं शकतें ही गोष्ट नाकारतां येत नाहीं. ह्या साधनांत सुकरता आणि स्वस्तता आणण्याच्या दृष्टीनें संशोधन चालूं आहे. स्त्री-पुरुषांच्या जननशक्तीला धक्का न लावतां मुलें होऊं देणें वा न देणें ही बाब सर्वस्वीं माणसाच्या हातीं राहील असें हमखास साधन शोधून काढणें हाच खरा आदर्श उपाय होय. त्या दृष्टीनें विचार करतां जनना-क्षम-( Sterilization )-तेची शस्त्रक्रिया हें पुरें उत्तर होऊं शकत नाहीं. कारण, त्या शस्त्रक्रियेमुळें वन्ध्यत्व आलेल्या स्त्रीला अगर पुरुषाला परत जननक्षम होतां येत नाहीं. आजचें शल्यशास्त्र कापलेली वीर्यवाहिनी अगर रजोवाहिनी हमखास जुळविली जाईल अशी हमी देऊं शकत नाहीं. अशा स्थितींत लेखक म्हणतात त्याप्रमाणें त्या शस्त्रक्रियेची स्त्री-पुरुषावर जबरी करणें प्रशस्त वाटत नाहीं. कुटुंबनियोजनासाठीं कायद्याचा बडगा वापरावा असें कांहीं लोकांना वाटतें. त्या मार्गानें लोकसंख्या लवकर काबूंत आणतां येईल असा त्यांना विश्वास वाटतो. पण कायद्यामुळें सामाजिक सुधारणेचें पाऊल लवकर पुढें पडतें असा अनुभव नाहीं. उलट, कायदा चुकविण्याकडे प्रवृत्ति बळावते असाच अनुभव येतो. संततिनियमनाच्या पुरस्कर्त्यांनीं हा अनुभव विचारांत घेतला पाहिजे. अर्थात् वरील शस्त्रक्रियेमुळें प्रजोत्पादन अजिबात थांबतें ही गोष्ट खरी आहे व ही गोष्ट स्त्री-पुरुषानां पटवून देऊन त्यांना ह्या शस्त्रक्रियेला तयार करण्याचे प्रयत्न व्हावेत हें निःसंशय ! त्या पद्धतीबद्दल लोकांचे गैरसमज दूर करण्यासाठीं प्रचार व्हावयाला पाहिजे व खुशीनें जे तयार होतील त्या स्त्री-पुरुषांना फुकट वा स्वल्प फींत शस्त्रक्रिया करून घेतां येईल अशीं केंद्रें निघालीं पाहिजेत. ही शस्त्रक्रिया स्त्री-पुरुषांच्या खुशीनें झाली असेल तर पुढें, समजा, दुर्दैवाचा घाला येऊन त्यांचीं मुलें दगावलीं तरी त्या जोडप्याला दुसऱ्याला दोष देतां येणार नाहीं. ह्याउलट, कायद्याच्या जबरीमुळें ही शस्त्रक्रिया झाली असेल तर विनाकारण लोकक्षोभास कारण मिळेल. अशा परिस्थितींत प्रा. पेठे त्या दुर्दैवी स्त्रीस कृत्रिम गर्भधारणा करून घेण्या- ( Artificial insemination ) चा मार्ग सुचवितात. ज्या विवाहित स्त्रीवर जननाक्षमतेची शस्त्रक्रिया झाली नसेल तिलाच हा मार्ग मोकळा असणार; पण तिच्या जोडीदारावर ती शस्त्रक्रिया झालेली असल्यामुळें दुसऱ्या कोणत्यातरी पुरुषाचें शुक्रबीज उपयोगांत आणावें लागेल आणि हा प्रकार आजच्या सांस्कृतिक नीतीला व मानवी स्वभावाला कितपत मानवेल ह्याची कल्पनाच करावी. यासंबंधांत डेन्मार्कमध्यें नुकत्याच घडलेल्या उदाहरणाचा जातां जातां उल्लेख करावासा वाटतो. तेथें एका विवाहित स्त्रीवर तिच्या नवऱ्याच्या सम्मतीनें तेथल्या एका प्रथितयश डॉक्टरानें कृत्रिम गर्भधारणा घडवून आणली. शुक्रबीज अर्थातच दुसऱ्या पुरुषाचें होतें. गर्भाची वाढ होत असतांना 'हें दुसऱ्याचें पोर' या कल्पनेनें नवऱ्याला चैन पडेनासें झालें. ' गर्भपात करून घे ' असा-लकडा त्यानें आपल्या बायकोच्या पाठीमागें लावला. नाईलाजास्तव त्या डॉक्टरकडे जाऊन तिनें त्याला गर्भपात करण्यास विनविलें. डॉक्टरनें त्या गोष्टीस साफ नकार दिला नि त्याचा परिणाम विवाह-विघटनेंत झाला ! ('सिंध मेडिकल जर्नल' मार्च १९५४ पान २४). सांगावयाची गोष्ट ही कीं लेखक समजतात तितका हा प्रकार सरळ आणि सोपा नाहीं. मानवी स्वभाव आणि कायद्याची कक्षा या गोष्टी सांभाळून कोणता कायदा करावयाचा हें ठरविलें पाहिजे. संततिनियमनासारख्या नाजूक प्रश्नांत







तर या बाबतींत फारच विचार झाला पाहिजे. प्रा. पेठे यांच्या सूचनेप्रमाणें कायद्याचा वडगा सक्तीच्या संततिनियमनासाठीं वापरला जाईल तर जननाक्षमतेची शस्त्रक्रिया व जादा कर चुकविण्यासाठीं लोक गर्भपाताकडे धांव घेतील आणि त्यासाठीं सरकारी रुग्णालयें पुरीं पडणार नाहींत. रुग्णालयांच्या अभावीं वाटेल त्या माणसांकडून आणि वाटेल त्या उपायांनीं गर्भपात करून घेण्याचे प्रयत्न होतील. अशा गर्भपाताचे परिणाम स्त्रियांच्या प्रकृतीवर काय होतील ह्याची कल्पनाच करावी. दुसरी गोष्ट अशी कीं माणसाच्या मनाविरुद्ध सरकारला शस्त्रक्रियेची सक्ती करतां येईल काय? लोकशाही सरकारला असें करतां येईल असें वाटत नाहीं. तिसरी गोष्ट ही कीं लोकशाहीच्या दृष्टीनें वैयक्तिक जीवनांत कायद्याचा अम्मल कमी राहील तितकें युक्त होईल. लोकसंख्येच्या वाढीचा प्रश्न जरी सार्वजनिक महत्त्वाचा असला तरी जननोत्पादनाची क्रिया वैयक्तिक आणि नाजूक बाब आहे. म्हणूनच कुटुंबनियोजनाची सक्ती करण्यापेक्षां त्याच्या आवश्यकतेची इष्टता स्त्री-पुरुषांना पटवून त्यांच्याकडून तें करवून घेणें हेंच फलदायी आणि परिणामकारक होईल.

गर्भपाताला कायदेशीरपणा देण्याची लेखकांची सूचना स्वागतार्ह वाटते. विशिष्ट कारणें सोडून दिलीं तर गर्भपात करणें हा सध्याच्या कायद्यानें गुन्हा आहे. त्यामुळें पुष्कळ स्त्रियांची कुचंबणा होते व त्याचा परिणाम अनभिज्ञ माणसांकडून चोरून गर्भपात करून घेण्यांत होतो. गर्भपाताच्या विरुद्ध असणारी कायद्याची बंदी गेली तर रुग्णालयांतून आधुनिक पद्धतीनें स्वच्छ व जंतुविरहित गर्भपात करून घेतां येतील व आज चालूं असलेल्या चोरट्या व्यवहाराला आळा बसेल. खालील तीन कारणांसाठीं गर्भपाताला कायदेशीरपणा येणें आवश्यक वाटतें: (१) इतर साधनें वापरूनहि जेव्हां गर्भधारणा होते त्यापासून मुक्तता करून घेण्याचा मार्ग स्त्रीला उपलब्ध व्हावयास पाहिजे. (२) बलात्कारामुळें गर्भधारणा झाली असेल तर असा गर्भ काढून टाकण्याचा हक्क त्या अभागी स्त्रीला मिळाला पाहिजे. (३) कोणता गर्भ वाढूं द्यावयाचा आणि कोणता नाहीं हें ठरविण्याचा अधिकार स्त्रीला मिळाला पाहिजे — ह्या तिन्ही कारणास्तव गर्भपातावरची बंदी उठली पाहिजे. त्याचा फायदा अनैतिक स्त्री-पुरुष घेतील म्हणून इतर स्त्रियांचा न्याय्य हक्क नाकारणें चूक होईल.

पण गर्भपाताच्या कायदेशीरपणाच्या आवश्यकतेची इष्टता मान्य करूनहि लेखक म्हणतात त्याप्रमाणें गर्भपातामुळें स्त्रीला त्रास होत नाहीं असें मात्र म्हणतां येत नाहीं. आधुनिक शोधामुळें गर्भपातामुळें होणाऱ्या स्त्रियांच्या मृत्यूचें प्रमाण जवळ जवळ नष्ट झालें असलें तरी बऱ्याच प्रमाणांत स्त्रियांना शारीरिक व मानसिक विकृति (morbidity) येते इकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं. कुटुंबनियोजनाच्या तिसऱ्या परिषदेंत डॉ. हॅन्स हर्म्टसेन (पश्चिम जर्मनी) यांनीं 'गर्भपाताचे परिणाम' याविषयावर वाचलेल्या निबंधांत लेनिनग्राडमधील 'स्टेट इन्स्टिट्यूट ऑफ मिडवायफ्री आणि गायनाकॉलजी' या संस्थेनें जमविलेल्या माहितीचा उल्लेख केला. गर्भपातामुळें स्त्रियांच्या प्रकृतीवर होणारे अनिष्ट परिणाम पुढील आंकड्यांवरून लक्षांत येतील: (अ) शेंकडा ३५ स्त्रियांना वंध्यत्व प्राप्त झालें. (ब) शेंकडा २० स्त्रियांना चिरकारी (Chronic) रोग लागले. (क) गर्भाशय सोडून इतरत्र होणाऱ्या गर्भधारणेपैकीं (ectopic gestation) शेंकडा ४० मध्यें पूर्वी केलेला गर्भपात हें कारण आढळून आलें. (३ ऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदेचा अहवाल, पान १५२). वर दिलेल्या माहितीचा विचार करतां गर्भपाताच्या कायदेशीरपणाची आवश्यकता मान्य करूनहि गर्भपातापासून स्त्रीला परावृत्त करणें किती जरूर आहे हें लक्षांत ठेवणें अगत्याचें वाटतें. अर्थात् धोका पत्करूनहि स्वतंत्र स्त्री गर्भपात करून घेण्यास उद्युक्त होईल आणि तिची ही मागणी लोकशाही राजवटीला नाकारतां येणार नाहीं.

विवाहाची कमींत कमी वयोमर्यादा (पुरुष) २५ व (स्त्री) २० करण्यांत यावी असें मत लेखकांनीं मांडलें आहे. तें झालें तर लोकसंख्येच्या वाढीला थोडाबहुत आळा बसेल. पण खेडवळ जनता त्याला विरोध केल्याशिवाय राहणार नाहीं. विवाहाची ही वयोमर्यादा समाजांत कितपत रूढ करतां येईल याबद्दल साशंकता वाटते.

सर्व विचार करतां प्रा. पेठे व डॉ. वसुंधरा गांधी यांनीं लोकसंख्येची वाढ थांबविण्यासाठीं जे उपाय सांगितले ते कुटुंबनियोजनाच्या चळवळीच्या दृष्टीनें उपयोगी पडतील असें वाटत नाहीं. ह्या चळवळीचा

मध्यबिंदु व्यक्ति आहे आणि शेवटीं त्या व्यक्तीच्या खुषीच्या आचरणावर चळवळीची यशस्विता अवलंबून आहे. संततिनियमनाच्या बाबतींत पति-पत्नींमध्यें देखील दुमत दृष्टीस पडतें. अशा वेळीं एकमेकांचें मतपरिवर्तन करूनच उद्देश साध्य करणें भाग पडतें. कायद्याच्या धाकानें ही चळवळ वाढणार नाहीं. कायद्यानें सामाजिक सुधारणा आणण्याच्या दारुबंदीचा प्रयोग समाजामध्यें कसा रुजत आहे ह्याचें प्रात्यक्षिक आपल्या डोळ्यासमोर आहे. संततिनियमनाची चळवळ तर जास्त नाजूक आणि स्त्री-पुरुषांच्या सामंजस्यावर अवलंबून आहे. ही कायद्यानें प्रस्थापित करण्याचा प्रयत्न होईल तर त्याविरुद्ध लोकमत खळबळून उठेल. आजतरी निदान ही स्थिति आहे कीं कुटुंबनियोजनाची आवश्यकता बहुसंख्य जनतेला अजून पटवून द्यावयाची आहे. मुलांना जन्म देणें वा न देणें हें माणसाच्या हातीं आहे हें ज्ञान त्यांना सांगावयाचें आहे, संततीचें नियमन कोणत्या साधनांनीं करतां येतें हें त्यानां शिकवावयाचें आहे; आणि हें प्रचारात्मक काम करीत असतांना संततिनियमन-केंद्रांमधून साधनें कशीं वापरावयाचीं, कोणतीं वापरावयाचीं ह्याचीं प्रात्यक्षिकें दाखवून बहुसंख्य स्त्री-पुरुषांना त्यांचा वापर करण्यास तयार करावयाचें आहे. कुटुंबनियोजनाचा संदेश खेडोंपाडीं पोंचविण्याचें कार्य अद्याप व्हावयाचें आहे. हें कार्य मोठें आहे आणि इतकें अवघड आहे कीं पट्टीचे समाजसुधारक देखील नाउमेद होतील. जास्त मुलें होऊं देणें ही विपरीत, लाज आणणारी गोष्ट आहे हा विचार समाजाच्या अंतरंगांत मुरवल्याशिवाय कुटुंबनियोजनाचें खरें कार्य सुरू होणार नाहीं. पण ही गोष्ट कायद्याच्या दंडुक्याऐवजीं लोकमत वळवून करणें इष्ट आणि आवश्यक आहे.

प्रा. पेठे म्हणतात त्याप्रमाणें लोकसंख्या मर्यादित ठेवणें अत्यंत अगत्याचें आहे यांत संदेह नाहीं. पण त्याबरोबरच कायद्याचा दंडुका हातीं न धरतां संततिनियमनाचीं जीं साधनें आज उपलब्ध आहेत त्यांचा वापर करण्यावरच भर देण्याशिवाय संततिनियमनवाद्यांजवळ दुसरा जवळचा रस्ता उपलब्ध नाहीं. अर्थात् ह्या मार्गानें हिंदी समाजाला दौडत नेलें पाहिजे याबद्दल दुमत नाहीं

—डॉ. र. भ. कर्णिक

**महात्मा फुले**--लेखक: श्री. ए. के. घोरपडे, प्रकाशक: श्री लेलनवाचनभाण्डार, पुणें २. (१९५४). पानें १६४. किं. १।।। रु.

आपल्या भारतदेशाची राजकीय दास्यांतून मुक्तता झाली असली तरी राजकीय दास्यविमोचनानंतर जे अनुभव येत आहेत त्यांवरून राजकीय दास्याबरोबरच सामाजिक दास्यांतूनहि मुक्तता होणें किती महत्त्वाचें आहे याची जाणीव हल्लीं तीव्रतेनें पुष्कळांना होऊं लागली आहे. त्यामुळेंच आतां सामाजिक गुलामगिरीविरुद्ध युद्ध पुकारणाऱ्या थोर समाजसुधारकांकडे आपण पुन्हां नव्या दृष्टीनें पाहूं लागलों आहों. त्यांच्या विचारांची आणि चरित्रांची उजळणी करणें हा मुद्दा आपल्या प्रगतीचा एक महत्त्वाचा भाग आहे. अशा समाजसुधारकांत महात्मा फुले यांचें स्थान अनन्यसाधारण आहे. बहुजनसमाजाच्या अव्यक्त आणि अमूर्त दुःखांना जाहीर वाचा फोडणारा या देशांतील हा पहिला बंडखोर लोकाग्रणी आहे. अशा एका उपेक्षित नेत्याचें जीवनचरित्र व कार्य श्री. ए. के. घोरपडे यांनीं प्रस्तुत पुस्तकाच्या रूपानें अत्यंत योग्य वेळीं वाचकांसमोर ठेवलें आहे.

'महात्मा फुले' या प्रस्तुत पुस्तकांतील सुमारें निम्मा भाग ज्योतीबांच्या चरित्रासाठीं दिला असून राहिलेल्या निम्मा भागांत त्यांच्या कामगिरीचा आढावा घेतला आहे. महात्मा फुले यांचें जीवनचरित्र उद्बोधक आहे. ज्योतीबांच्या जीवनाबद्दल बहुश्रुत वाचकांनाहि कांहीं माहिती नवी वाटण्याचा खास संभव आहे. चरित्र लिहीत असतांना लेखकाचा ज्योतीबांच्या जीवनाबद्दल वाटणारा अपार जिव्हाळा जागजागीं प्रत्ययाला येतो. त्यामुळें शैलीला मनोरम सहजता आली आहे. सर्व पुस्तकभर भाषा ओघवती आणि कांहीं कांहीं ठिकाणीं चांगली कसदार वाटते. ज्योतीबांच्या आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या चरित्रग्रंथावर संतुष्ट न राहतां नवें स्वतंत्र चरित्र लिहिलें तर बिघडतें कुठें, हा प्रश्न ते आपल्या विशिष्ट शैलीनें आक्षेपकांना विचारतात : " बापदादांनीं पाडलेल्या विहीरीवरच चांटण्या करण्यापेक्षां नव्या धर्तीची नवी विहीर खणून तिचें पाणी चारी दिशांना खेळविलें आणि नव्या पिकांचा मळा पिकविला तर काय बाभळ बुडते ? " ( पा. ७ ).








ज्योतीराव फुल्यांच्या कार्याचें मूल्यमापन करतांना त्यांनीं त्यांच्या महत्त्वाच्या कार्यावर बोट ठेवलें आहे. ज्योतीराव फुले हे राष्ट्रवाद आणि धर्मभेद यांचे कट्टे विरोधक होते आणि विशुद्ध विशाल मानवतावादाचे एकनिष्ठ उपासक होते. ज्योतीरावांचें मोठेंपण या त्यांच्या मानवतावादी विचारांत आहे. राष्ट्रवाद मानवसमाजांत अकारण वैर निर्माण करून मनुष्यजातीचें बंधुत्व व शुद्ध सहकार्य यांच्या आड येतो. राष्ट्रवाद हा पिंडानें आक्रमक आणि युद्धपिपासु आहे. मानवाचें कर्तृत्व त्यामुळें निष्कारण वांया जातें. जी गोष्ट राष्ट्रवादाची तीच गोष्ट धर्मभेदाची आहे. विशिष्ट धर्माच्या अभिमानानें मनुष्यजातीचे तुकडे पडले असून वैराचें बीज कायमचें रोंवलें गेलें आहे. धर्माभिमानानें मनुष्यजातीचें रक्त अनेक वेळां वाहिलें आहे. सर्व मानवांचें ऐक्य हें एक श्रेष्ठ सत्य आहे आणि याच सत्याचा अपलाप व नाश धर्माभिमान करतो. ज्योतीबा हे सत्याच्या शोधासाठीं बाहेर पडलेले जन्मभर प्रवासी होते. 'सर्व मानव तेवढा एक आहे' हें सत्य त्यांना सांपडलें होतें. ज्योतीबांच्या सर्व कार्याला आणि विचाराला याच विशाल प्रेरणेची बैठक आहे. अस्पृश्योद्धाराची चळवळ, स्त्री-शिक्षण, चुकून वांकडें पाऊल पडलेल्या महिलांची प्रसूति-व्यवस्था, बहुजनसमाजाची सामाजिक आणि आर्थिक दुरवस्था दूर होण्याची तळमळ—हीं सर्व त्यांच्या मनांतील या प्रेरणेचीं प्रतिबिंबें होत. ब्राह्मण्यावरील आणि ब्राह्मणावरील जळजळीत टीका ही देखील याच तळमळींतून बाहेर पडलेली आहे. श्री. घोरपडे यांनीं ज्योतीबांच्या या विचाराचा परामर्श तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या 'ज्योतिनिबंधा'च्या आधारें घेतला आहे. ज्योतीबांच्या विचाराची ही विशाल बैठक लक्षांत घेतली म्हणजे त्यांच्या ब्राह्मण्यावरील अनेक कडवट हल्ल्याकडे आपण सहानुभूतीनें पाहूं लागतों. श्री. घोरपडे यांनीं या मुद्द्याकडे वाचकांचें विशेष लक्ष वेधलें आहे.

ज्योतीबांच्या सत्यशोधक चळवळीचा परामर्श लेखकानें घेतला असून तो १९५१ पर्यंत आणून ठेवला आहे. या विवेचनांतील अपुरेपणा क्वचित् प्रसंगीं जाणवतो. ज्योतीबानंतर जी सत्यशोधक चळवळ झाली तिला ज्योतीबांची मूळची समतेची भूमिका कितपत पेलली ? या चळवळीनें समाजांतील स्पृश्य-अस्पृश्य किंवा स्पृश्यांमधील देखील उच्च मराठे व इतर मराठे यांच्यांतील विषमता किंवा भेद नष्ट करण्यासाठीं काय केलें ? ज्योतीबांच्या चळवळीला मूळची समतेची प्रेरणा जर पचवितां आली नसली तर तिची मीमांसा कशी करायची ? दुसरें असें कीं ब्राह्मण—ब्राह्मणेतर-चळवळ नर्मदेच्या दक्षिणेला मुख्यतः महाराष्ट्र व मद्रासमध्येंच कां जन्माला आली ? उत्तरेकडे या वादाला एवढें उग्र स्वरूप नाहीं-तिला एवढें उग्र स्वरूप या प्रांतांतच कां आलें ? या वस्तुस्थितीची वस्तुनिष्ठ समीक्षा होणें अवश्य आहे. प्रस्तुत चरित्रलेखनांत शब्दाशब्दांतून ज्योतीबाबद्दलचें अथांग प्रेम ओसंडत आहे हें खरें. परंतु त्यामुळेंच कीं काय क्वचित् ठिकाणीं तटस्थ अभ्यासकाची भूमिका सुटल्याची शंका मनाला चाटून जाते. जिव्हाळा आणि तटस्थता यांचा संगम नेहमींच हृद्य असला तरी तो तितकाच कठिणहि असतो. त्याचप्रमाणें कांहीं ठिकाणीं विपर्यांतर झालेलें आढळून येतें. लिहिण्याच्या ओघांत एखाद-दुसऱ्या ठिकाणीं विसंगति राहून गेलेली आहे. उदाहरणार्थः ज्योतीराव हे राष्ट्रवादाचे कडवे विरोधक होते असें एके ठिकाणीं विवेचन आलें आहे. परंतु एका प्रकरणाला लेखकानें त्यांचा गौरव करण्यासाठीं 'ज्योतीची ज्वलंत राष्ट्रभक्ति' असें शीर्षक दिलें आहे. अर्थात् असे दोष सहित्याच्या प्रांगणांत अनेक तपें खर्च केलेल्या लेखकांच्या ग्रंथांतूनहि कधीं कधीं आढळतात. त्यामुळें नव्यानेंच भीत भीत या क्षेत्रांत पाऊल टाकणाऱ्या घोरपडे यांच्यासारख्या होतकरू लेखकांमध्यें हे दोष आढळले तर फारसा अचंबा वाटण्याचें कारण नाहीं. श्री. घोरपडे यांच्या पुस्तकाचें मोल वरील कांहीं वैगुण्यांमुळें कमी होण्याचें कारण नाहीं. त्यांनीं हें पुस्तक लिहून ज्योतीबांच्या अभ्यासकाला बहुमोल मदत केली आहे. याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन.

—मा. प. मंगुडकर